नागपूर प्रकाशन क्रमांक—३४

# मधु

लेखक
दत्त एकनाथ सुगांवकर






सन १९५० ] सीताबर्डी नागपूर. [ किंमत २॥ रु.

# " मधू " ची ओळख



आपल्या " मधु " या कादंबरीस प्रस्तावना लिहून देण्याची श्री. सुगांवकर यांनी जेव्हां मला विनंति केली तेव्हां मी कांहीसा गोंधळून गेलों. दुसऱ्यांच्या पुस्तकांना प्रस्तावना लिहून देण्याइतका मी प्रथितयश लेखक झालों कीं काय असा कांही काल मनाला संभ्रम पडला. पण विचारांतीं हा भ्रम दूर झाला. आणि शेवटीं वाटूं लागलें कीं माझे कांही साहित्यिक मित्र म्हणतात त्याप्रमाणें मी परिचयच लिहावे. पुस्तकाचीं सर्व पानें न वाचतां तें वाचल्याचें समाधान मिळवूं पाहाणाऱ्या किंवा प्रौढी मिरविणाऱ्या वाचकांची माझ्या " परिचया " मुळें चांगली सोय होते म्हणे.

तें कांहीही असलें तरी " मधू " चा परिचय करून देतांना मला अवघडल्यासारखें वाटतें. कारण प्रो. भा. म. गोऱ्यांच्या एका छोट्या कादंबरीला छोटी प्रस्तावना लिहून देण्याचा अपवाद सोडला तर मी ज्या डझनांनी प्रस्तावना लिहिल्या आहेत त्या माझ्या स्वतःच्या पुस्तकांना किंवा मी प्रकाशित केलेल्या पुस्तकांना. नुसत्या तोंडओळखीच्या आधारावर दुसऱ्या व्यक्तीचा वा दुसऱ्याच्या कलाकृतीचा तिसऱ्या व्यक्तीला किंवा वाचकाला यथार्थ परिचय करून देणें ही खरोखर मोठी अवघड गोष्ट आहे. " मधू " च्या लेखकाच्या स्नेहार्द आग्रहामुळेंच ही अवघड गोष्ट करायला मी प्रवृत्त झालों आहे.

"मधु" ही एक प्रेमकथा आहे. अर्थातच वाचकांना तींत तत्वप्रचार, बोध, राजकारण, क्रांति असल्या गोष्टी आढळणार नाहींत. कलेकरतां कला कीं जीवनाकरतां कला यांपैकीं कोणत्या तत्त्वावर लेखकाचा विश्वास आहे हें मला माहीत नाहीं. पण प्रस्तुत कादंबरींत मात्र लेखकानें कलेकरतांच कला राबवून घेतलेली दिसेल. या बाबतींत श्री. सुगांवकरांनी प्रो. फडक्यांच्या कलावादाचें अनुकरण केलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ललित वाङ्मयाचा हेतू रंजन हें तत्त्व एकदा स्वीकारल्यानंतर ललितकृति जास्तींत जास्त रंजक करण्याचा प्रयत्न लेखकानें केला पाहिजे हें ओघानेंच येतें. आणि समाधानाची गोष्ट ही कीं सुगांवकरांनी तसा तो केला आहे.

कादंबरींतील सारीं पात्रें " उच्चभ्रू " समाजांतील आहेत, त्यांचें जीवन निर्जीव आहे, त्यांच्या भावना तकलुपी आहेत, त्यांचें प्रेम आणि द्वेष, राग व लोभ मिळमिळीत आहे, महाराष्ट्रीय समाजाचें यथार्थ दर्शन त्यांत घडत नाहीं, महाराष्ट्राचा मर्द मराठी बाणा त्यांत दिसत नाहीं, असें अनेक प्रकारचे आक्षेप अशा कादंबऱ्यांवर घेतले जातात. पण वाचकांनी एक गोष्ट लक्षांत घ्यावी कीं केवळ रंजनासाठीं–मनोविनोदनासाठीं ज्या कादंबऱ्या लिहिल्या जातात त्यांत त्यांनी या गोष्टींची अपेक्षा करूं नये. प्रो. फडके म्हणतात त्याप्रमाणें काय सांगितलें आहे त्यापेक्षां तें कसें सांगितलें आहे याकडेच वाचकांनी लक्ष द्यावें.

" मधू " कादंबरीत काय सांगितलें आहे त्यापेक्षां तें कसें सांगितलें आहे याकड वाचकांनी लक्ष पुरविलें म्हणजे त्यांचा अपेक्षा भंग व्हायचें मुळींच कारण नाहीं. एक चांगली प्रेमकथा वाचल्याचें समाधान त्यांना निःसंशय मिळेल. एका सधन प्रकाशकाची-भय्यासाहेबांची—माधवी ही एकुलती एक मुलगी. रेल्वेंत नोकरी करणाऱ्या एका विद्याधर नांवाच्या सुदृढ, सुंदर, तरुण इंजीनियरवर तिचें मन जडतें–हा इंजीनियर लेखकही असतो. भय्यासाहेबांना मुलीच्या या भानगडीची माहिती नसते. तें तिचें एका रिझर्व बँकेंतील बडया अधिकाऱ्याशीं लग्न जुळवितात. माधुरी या लग्नाला नकार देते. आणि मध्यें आणखी कांही घडामोडी घडल्यावर भैय्यासाहेबांना मुलीनें निवडलेल्या त्यांच्या जांवयाचा शोध लागतो. शेवटीं विद्याधर-माधुरी मीलन होतें. असें सरळ, साधें, वाचकांच्या परिचयाचें हें कथानक आहे. पण " कौशल्य सारें रचनेंत आहे " म्हणतात. त्याप्रमाणें लेखकानें हें साधें कथानक इतक्या कौशल्यानें सांगितलें आहे कीं वाचकाचें मन त्यांत सुरवाती पासून शेवटपर्यंत रमून जातें. रंजनासाठीं लिहिलेल्या कादंबरीचें यशापयश याच कसोटीवर पारखून घ्यायचें असतें. एका बैठकींत वाचून संपवावी असें वाटायला लावणारी कादंबरी या दृष्टीनें यशस्वी ठरली असें म्हणतां येतें.

अशी कादंबरी लिहितांना जीं पथ्यें पाळावयाचीं असतात तींही श्री. सुगांवकरांनी मोठ्या कुशलतेनें संभाळलीं आहेत. साधें कथानक परिणामकारक करावयाचें तर वाचकांची उत्कंठा वाढती ठेवावी लागते. आणि ती तशी वाढवण्यासाठीं वाचकांची अपेक्षा ताणावी लागते. अपेक्षाभंगाचा एकादा गोड धक्काही मधून मधून द्यावा लागतो. कल्पनेची चमत्कृति करून दाखवावी लागते. "मधू" त वाचकांना या रचना कौशल्याचा अनुभव आल्याशिवाय राहणार नाहीं.

आणि या असल्या अवखळ, अचपल विषयाला खुलून दिसणाऱ्या भाषा शैलीचा लेखकानें उपयोग केला असल्यामुळें वाचक कथानकाबरोबर वाहात जातो हाही या कादंबरीचा एक विशेष आहे. लेखकानें प्रो. फडक्यांचें अनुकरण केल्याचें जर कुठें स्पष्टपणें दिसून येतें तर तें याच बाबतींत. कादंबरीच्या पहिल्या प्रकरणांतील पहिलेंच वाक्य वाचलें म्हणजे माझ्या म्हणण्याचा प्रत्यय येईल.

पण श्री सुगांवकरांचें मला दुसऱ्याच एका बाबतींत अभिनंदन करायचें आहे. ते रेल्वे कंपनींत नोकरीत आहेत. आणि आपल्या नोकरीत मिळालेल्या ज्ञानाचा व अनुभवाचा उपयोग त्यांनी आपल्या कादंबरींत करून घेतला आहे. कल्पनांना स्वैर संचार करण्यास मोकळीक देण्यापेक्षां त्यांना आपल्या अनुभवाच्या क्षेत्रांत मोकळ्या सोडल्या तर आपलें लिखाण अधिक सरस होतें, त्यांत अधिक जिवंतपणा येतो, लेखक आपल्या विषयाशीं अधिक समरस होतो. श्री. सुगांवकरांनी आपल्या नायकाला रेल्वे इंजीनियरचा पेशा आणि लेखनाचा छंद दिला आहे

परिचय किंवा प्रस्तावना लिहिणाऱ्याचें काम रसग्रहणाचें असतें. गुणदोषदिग्दर्शनाचें नसतें. तें करण्याची कामगिरी परीक्षकांकडे सोपवून आणि चांगल्या शैलीने लिहिलेली एक चांगली प्रेमकथा वाचकांना दिल्याबद्दल श्री. सुगांवकरांचें अभिनंदन करून, परिचयाचे हे दोन शब्द मी पुरे करतों.

१४ त्रिभुवनरोड<br>मुंबई ४<br>८ डिसेंबर ४९.

**ग. द. सातोस्कर**

# श्री दत्त एकनाथ सुगांवकर यांची

## ★ इतर पुस्तकें ★

### प्रकाशित

**बालवाङ्मय**

१ विद्यावती व सुकांत
२ गफूर नजीम व शमीम

**कादंबरी**

१ मधु

**गुप्तहेर कथा**

१ उल्कापात ( पूर्वार्ध )
२ उल्कापात ( उत्तरार्ध )
३ हेमावती
४ विजया
५ सर भालचंद्र
६ विद्या
७ आकाशीचा चंद्र
८ रहस्य छेद
९ किरणांचे खून
१० भूषणा
११ रेलगाडीची चोरी
१२ प्रेम साफल्य
१३ हरित-कुञ्ज

**प्रातिनिधीक कथासंग्रह**

१ बंगला आणि झोपडी
२ कपिला षष्ठी

### आगामी

**कादंबऱ्या**

१ कृष्णा
२ बेचाळीस ते पंचेचाळीस

**बालवाङ्मय**

१ सुवर्ण नगरीचा राजपुत्र
२ सिंदबादची आणखी एक सफर

**गुप्तहेर कथा**

१ सूर्यबाण
२ वसंत व्यूह
३ विश्वास

**लघुकथा**

१ अंध पोरी
( प्र. ले. भालचंद्र खांडेकर )
२ कमळांचा कुञ्ज

**नाटक**

१ पण एका अटीवर

**रेडिओ**

१ झंकारित नाट्यसंग्रह

# १ : : गव्हर्नर सी. डी. देशमुख

एकाद्या गोष्टीची अपेक्षा करीत असावें, आणि त्याची उपेक्षा होणार आहे हें आपणास नक्की माहित असावें; मग माणसाला जी एक मनापासून चीड येते—निदान माधवीला तरी तसें आज झालें होतें !

ठाण् ठाण् ठाण् करून घडाळ्यानें तीन्हीचे ठोके वाजवले, तरी अद्याप भय्यासाहेबांचा पत्ता नव्हता. माधवी व्हरांडयांत आली व घडयाळाकडे पहात समोरच्या वेली बाजूला सारीत तिनें दूरवर नजर टाकली. भर दुपारची वेळ! अहोरात्र गरजणारा सागर सुद्धां विसाव्यासाठीं एकाद्या निर्जन बेटावर पहुडलेल्या मगराप्रमाणें शांत व अचेतन पडला होता ! मग त्याच्या कांठावरून धावणाऱ्या रस्त्यांची ती काय कथा ? एरवी गजबजलेला आणि अहोरात्र हॉर्नच्या नादानें किंचाळणारा तो रस्ता मृतवत् शून्य आणि कसासाच भासत होता. मध्येंच एकादी दुसरी मोटार येई आणि पहाता पहाता नळींतून धूर सोडीत दिसेनाशी होई.

माधवीनें दूरवर नजर टाकली पण भय्यासाहेबांची मोटर तिला कुठेंच दिसेना. ती स्वतःशी कांहींतरी पुटपुटली व थोडयाशा रुसव्यानेंच मागे वळली. तोंच तिला यशोदाबाईची हांक ऐकू आली.

“ माधवी ! ”

“ काय आई ! ”

माधवी दुसऱ्याच क्षणाला आईच्या पुढयांत जाऊन उभी राहिली. यशोदाबाईनीं त्यावेळला कपडयाचें कपाट उघडलेलें दिसत होतें. दहापंधरा कपडयांचा घोळ त्यांच्याभोवतीं विखुरलेला होता व शेवटीं आतां काय घ्यावें व काय न घ्यावें याचा विचार ठरेनासा झाल्यामुळें त्यांनीं माधवीला हांक मारली होती. माधवी येतांच त्यांनीं तिच्याकडें पाहिलें व नंतर विचारलें

" तूं काय करत होतीस ग ? "

" मी ! वर जाऊन दादा कुठें दिसताहेत का तें पहात होतें. "

" म्हणजे ? " यशोदाबाई आपल्याला मुळांत काय हवें होतें तें विसरल्या आणि थोडें आश्चर्यानें माधवीकडे पहात म्हणाल्या

" म्हणजे अजून कां हे आले नाहींत ? "

" नाहीं ग ! " माधवीला आपल्या आईच्या त्या साऱ्या पसाऱ्याकडे पाहतांच हंसू आलें व ती ओठावर तर्जनी टेकवीत म्हणाली " झालीच आहे त्यांची वेळ ? येतील पण आतां ! पण तूं हा काय पसारा मांडून बसली आहेस ग ? "

" होय ग ! " माधवीनें विचारल्यावरून यशोदाबाईंना पुन्हा आठवण झाली व त्या माधवीकडें पहात म्हणाल्या,

" पहा ग, यांतलें कोणकोणते कपडे घ्यायचे, आणि कोण-कोणते ठेवायचे ते ! हा स्वेटर—

" आई ! " माधवीला आणखी जास्तच हंसू आलें, कुठेंही गांवाला जायचें म्हटलें कीं तिच्या आईची अशीच धांदल उडत असे.

" आई ! " ती हंसत हंसत म्हणाली " अग आपल्याला जायचं आहे लोणावळ्याला ! आणि तिथं हा स्वेटर घेऊन काय करायचा आहे ? "

" तें पहा बाई तुझं तूंच ! तूंच निवड ते कपडे ! "

यशोदाबाई दूर झाल्या. माधवीनें कपाटाकडे नजर फेकली व नंतर हलके हलके ती एकेक घडी बाहेर काढू लागली. सुमारे पंधरा मिनिटांत तिनें दोन्ही पेटया व्यवस्थित भरल्या व आईकडें पाहिलें. यशोदाबाई कौतुकानें आपल्या लेकीकडें पहात होत्या. आपल्याला अवघड वाटणारें काम माधवीनें झटपट आवरलेलें पाहून त्या कांहीं बोलणार तोंच पोर्चमध्यें दिनकररावांच्या मोटारीचा आवाज आला.

दिनकरराव म्हणजे धिप्पाड करारी मजबूत ! सुमारे पन्नाशीच्या सुमारचे ऐटबाज गृहस्थ होते. त्यांनीं पन्नाशीची मजल गांठली होती तरी त्यांच्या अंगांत अद्याप पंचविशीचा उत्साह होता. त्यांची करारी मुद्रा व बाणेदार चेहरा—अद्याप त्या चेहऱ्यावर एक सुरकुती पडली नव्हती किंवा मिशीचा एक केसही पांढरा झाला नव्हता. दिनकररावांना ह्या गोष्टीचा फार अभिमान वाटत होता व क्वचित् प्रसंगीं त्यांच्या हाताखालच्या माणसानें कामचुकारपणा केला, किंवा प्रकृतीची सबब सांगितली तर ते बोलूनही दाखवत असत

" काय तुम्ही हीं अलिकडचीं पोरं ? "

दिनकरराव मुंबईंत आले तें पंचविशीच्या सुमारास ! सोलापूराहून ते आले ते हातांत फक्त लोटा घेऊन ! आणि आज पंचवीस वर्षांनंतर ते पुस्तकाच्या धंद्यांतले म्हणजे एक मानाचे असामी समजले

जात ! लाखांनीं त्यांनीं संपत्ति मिळविली व फोर्टमध्यें त्यांची दिनकर माधव ट्रेझरी ऑफ बुकस म्हणजे अेक अवाढव्य फर्म समजली जात होती. माधवीच्या जन्मापासून त्यांच्या या अतोनात उत्कर्षाला सुरुवात झाली होती व म्हणून फर्मच्या नांवांत त्यांनीं माधवीचें नांव नंतर मोठया हौसेनें गोवून टाकलें होतें.

हॉर्नचा आवाज करत पोर्चमधें मोटर थांबली व गाडीचे हिसके चालू असतांच कोटाची कॉलर नीट करीत दिनकररावांनीं काठीची मूठ हातांत घेतली. खिडकीच्या कडांतून डोकावत त्यांनीं दाराच्या हँडलला हात घातला. व दुसऱ्याच क्षणीं माधवी वेगानें व्हरांडयांतून धावत आलेली त्यांनीं पाहिली. पहाता पहाता ती पायऱ्या उतरून खाली आली व घाईघाईनें मोटरचें दार उघडत तिनें भय्या-साहेबाकडें पाहिलें. वेगानें धांवत आल्यामुळें तिच्या भालप्रांतावर घर्मबिंदु चमकत होते व कंपनाच्या वेगामुळें उरोज स्पंदन पावत होते. केसांच्या बटांतून वेणीचे दोन पेंड रिकामे सुटले होते व वाऱ्याच्या झोताबरोबर त्यांच्या ज्या स्वैर हालचाली होत त्या मोठया विलोभनीय वाटत.

“ भय्यासाहेब ! ” दिनकरराव काठी टेकून खालीं उतरलेले पाहतांच ती पुढें होऊन म्हणाली “ भय्यासाहेब, तुम्ही किती वाजतां यायचं कबूल केलं होतं ? ”

“ होय पोरी ! ” भय्यासाहेब हंसत हंसत म्हणाले “ अग पण जिथं कांहीं कांहीं गोष्टी पुढं नाईलाज होतो तिथं काय काय करायच ? तूंच सांग ! ”

" अं ऽ जा ! तुमचं हें नेहमीचंच आहे ! "

" अरे वा ! " भय्यासाहेब कौतुकानें तिच्या आविर्भावाकडें पहात म्हणाले " समज तूं उद्यां कॉलेजला जायला निघालीस अन् अर्ध्या वाटेंत—असें म्हणून दिनकररावांनीं तिच्याकडें पाहिलें.

" हं ! अर्ध्या वाटेंत काय ? "

" समजा अर्ध्या वाटेंत पोलिसानें हात आडवा केला ! "

" बरं मग ? "

" तो सुमारे अर्धा तास ! "

" हो ! पण तुम्हाला यायला एक तासापेक्षा उशिर झाला आहे ! "

" ऐकून तर घे ! आणि अर्ध्या तासानंतर पोलिसानें सांगितलें कीं समोरचा रस्ता बंद आहे–"

" वा ऽ वा ! "

माधवीला दिनकररावांचें हें चऱ्हाट ऐकून इतकें हंसू आलें कीं दिवाणखान्यांत येईपर्यंत ती सारखी हंसत होती, सारखी हंसत होती.

" पण तुमच्या जागी मी असतें तर काय केलें असतें भय्या-साहेब, सांगु ?" त्यांचा कोट व टोपी हँगरवर चढवत माधवीनें विचारलें.

" हं ! "

" मी परत वळलें असतें, पण जातांना त्या पोलिसालाही मोटा-रींत बरोबर घेतलें असतें, व मोटार सोडली असती थेट ठाण्याच्या दिशेनें ! "

" वा ऽ वा ! " दिनकररावांना आपल्या पोरीचें कौतुक वाटलें व कोचावर बसून टेबलावरचा हातपंखा ओढत ते म्हणाले

" तू बरीच हुशार झालीस हं माई ! "

" म्हणजे ? " यशोदाबाईंनीं दिवाणखान्यांत प्रवेश केला व टेबलावर सरबताचें कांचपात्र व कांचेचे तीन पेले ठेवीत माधवीकडे पहात त्या म्हणाल्या " आतां कां तिला अजून लहान समजायची आहे ? चित्रकलेची तिनें एवढी मोठी परीक्षा दिली, आणि उद्यां ती पदवीधर सुद्धां होईल ! आणि तुम्ही आपले अजून तिला—"

" हो ! असू द्या ! आम्हाला आपली ताई अजून लहानच आहे ! "

" हो ! आणि आज एवढा उशिर कां झाला ? गाडीला फक्त दीडच तास उरलाय ! चला लवकर आपण खाऊन घ्या ! "

" हो हो ! चला ना ! " भय्यासाहेबांनीं एका घोटांत सरबत संपवलें व ते उठून उभे रहात म्हणाले " मी लवकर निघालोंच होतों पण वाटेत त्या देशमुखांनीं मला अडवलं ! मी थांबणार नव्हतों, पण फारच मोठा मनुष्य पडला तो. मला नाहीं म्हणता येईना. तरी पण मी गाडीवर सर्व व्यवस्था करून ठेवलली आहे. सबनीसांना पुढें पाठवलें आहे व तिकिटें काढून गाडींत दोन बर्थसुद्धी पकडून ठेवायला सांगितलें आहे. आतां तुम्ही फक्त जेवण करायचें कीं निघायचें ! "

" इश्श्य ऽ ! " मान वेळावत माधवी म्हणाली " इथून लोणावळ्यापर्यंत प्रवास तो काय, आणि त्याच्यासाठीं तुम्ही सबनीसांना त्रास दिलात ? "

यावर दिनकरराव प्रच्छन्नपणें हंसले, जणूं ' तुला खरंच अद्याप कांहींं समजत नाहीं माधवी, ' असाच त्यांच्या हंसण्याचा आशय होता. गाडीला अजून भरपूर अवकाश होता तरी त्यांनीं निघण्याची बरीच

गडबड केली व कशातरी गडबडीनें ते बोरीबंदरवर येऊन पोचले तेव्हां दुसऱ्या वर्गाच्या खिडक्यापाशीहि तिकिटासाठीं लागलेली गर्दीची रांक पाहून माधवीलाही आश्चर्य वाटलें. दिनकररावांनीं उतरतां उतरतां तिच्याकडे पाहिलें. 'आतां आलें माझ्या बोलण्याचें प्रत्यंतर!' असाच भाव आतां त्यांच्या नजरेंत होता व ती गर्दी पाहून माधवीला खरेंच आश्चर्य वाटलें होतें! गेल्या दोनतीन वर्षांत तिला मुंबईबाहेर जाण्याचा प्रसंग आला नव्हता हें खरें, पण त्या काळांत प्रवाश्यांच्या जगाची स्थिती इतकी पालटून जाईल अशी तिला कल्पना नव्हती.

प्लॅटफॉर्मवरही एकच गर्दी माजलेली दिसत होती व एरवी सुने बोडके आणि उघडे दिसणारे वरच्या वर्गाचे डबे सुद्धां अगदीं गच्च भरून गेलेले तिला दिसले. दोन वर्षांपूर्वी कधींही न दिसणारे खाकी वेशांतील चेहरे तिला दिसूं लागले होते व आतां समुद्रापलीकडे चाललेल्या लढाईनें हिंदुस्तानच्या नागरी जीवनांत इतका बदल करून टाकलेला पाहून ती चकित झाली.

संत्री मुसंबीवाले 'मिठा माऽल' करून ओरडत होते व त्याच्याच जोडीला काजू-गरांची एक भली मोठी गाडी 'ए मे ऽ वा', करून हिंडत होती. प्लॅटफॉर्मवर एकच गर्दी उडालेली होती व अशा परि-स्थितींत आपणांस जागा तरी कशी मिळणार या चिंतेनें ती थोडीशी अस्वस्थ झाल्याखेरीज राहिली नाहीं. पण इतक्यांत तिला दिनकरावांचे मुनीम सबनीस हाक मारत असलेले दिसले.

" काय हो माधवराव ? " भय्यासाहेब पुढें होत म्हणाले.

" या ना मी इकडे जागा पाहून ठेवली आहे ! " सबनीस पुढें म्हणाले.

" ठेवली आहेत ना ? वा!" असें म्हणत दिनकररावांनीं माधवी-कडें पाहून स्मित केलें.

" वाऽवा तर! चांगल्या दोन बर्थस् राखून ठेवल्या आहेत ना!"

आणि तें ऐकताच माधवीची चर्या सुप्रसन्न झाली आणि त्यापेक्षां ही जास्त ती जागा पाहिल्यावर अधिकच खुलली. त्यांचें सामान पुढें आलेंच होतें व बाळूनें दोन बर्थस्वर त्यांचे होल्डाल्स पसरून सारें सामान व्यवस्थित रचलें होतें. गाडी सुटण्याची वेळ झाली होती व कांटा जसजसा पुढें सरके तसतसें गेटमधून एकेक तुंदिल तनु शेट घाईघाईनें आंत येताना पाहिलें म्हणजे माधवीला हंसू येत होतें. दिनकर-राव खालीं उभे होते व सबनीस त्यांना मोठमोठयानें गाडींत जागा कशी नव्हती, व ' अप्पर लेडीज क्लास ' ही कसा नव्हता व आपण त्याकरता तक्रार करून तो बोर्ड कसा बसवायला लावला व नंतर झट्कन बिछाने कसे घालायला लावले याचें रसभरीत वर्णन करून सांगत होते. सबनीस हे दिनकररावाचे जुने मुनीम! खुद्द माधवीचेंही त्यांच्या सालसपणाबद्दल फार चांगलें मत होतें. पण या गृहस्थानें अशा वेळीं आपल्या वडलांना अडकावून ठेवावे व भय्यासाहेबानींही कौतुकानें त्याचें बोलणें ऐकत रहावें हें थोडेसें माधवीला चत्मकारिकच वाटलें.

पण कांटा आणखी पुढें सरकला तसें दिनकरराव खिडकीकडें आले व चौकटीवर कोपरे टेकून एका हातानें टोपी थोडीशी नीट-नेटकी करण्याचा प्रयत्न करून म्हणाले

" हं! मग काय ताईसाहेब! आतां परत येणार ते पदवी घेऊनच अं ? मग काय तुमचा दिमाख विचारता ? "

" वा भय्यासाहेब ! बरंच आहे कीं तुमचं " माधवी थोडेंसें भैय्यासाहेबांच्या बोलण्याचें हंसूच येऊन उत्तरली.

" हं ! बरं, तिथं प्रकृतीला जपून रहायचं ! "

" म्हणजे काय ? आठवडाभरानें तुम्ही येणारच आहांत ना ? "

" होय, पहातों आतां कितपत जमते ते ! "

" असं चालायचं नाहीं हं दादा ! "

यावर भय्यासाहेब मोठमोठ्यानें हंसले व त्यांनीं आजुबाजूला पाहिलं. माधवीकडे पाहून ते कांहीं बोलणार तोंच त्यांच्या मागच्या एका उंचनिच आणि किडकिडीत गृहस्थानें त्यांना नमस्कार केला व त्यांच्यांशी हस्तांदोलन करत तो तोंडांतून सिगारेट आणि डोक्यावरून हॅट बाजूला करत म्हणाला

" Hallow Joshi, This is our accidental crossing on second occasion ! ( नमस्कार मि. जोशी, आज ही योगायोगानें झालेली आपली दुसरी भेट आहे हं ! )

दिनकररावांनीं त्यांच्याकडें पाहिलें आणि क्षणभरांत त्यांचाहि चेहरा उजळून निघाला. त्यांनींही त्यांच्याशी जोराजोरांत हस्तांदोलन केलें व आवाजांत मार्दव आणून ते उद्गारले

" Oh ! Mr. Deshmukh, really very glad to see you again !" ( कोण ? मि. देशमुख ! वा ऽ ! खरोखरच आपणांस पाहून पुन्हा आनंद झाला ! )

" Oh ! you intend to fly away from Bombay ? " ( तुम्ही कुठें बाहेरगांवीं जात आहांत काय ? )

" No, no, Mrs. Joshi & Miss "—असें म्हणून त्यांनीं माधवीकडें पाहिलें व नंतर पुन्हा ते त्या गृहस्थाकडे पहात म्हणाले "Come along! Let me introduce you to my daughter ( या, मी आमच्या मुलीशीं तुमची ओळख करून देतों ! ) "

असें म्हणून ते माधवीकडें वळले व तिच्याकडें व देशमुखांच्या कडें पहात म्हणाले

" हे श्री. सी. डी. देशमुख, रिझर्व्ह बँकेचे असिस्टंट गव्हर्नर आहेत ! "

सी डी. देशमुख ! माधवीला आपल्या कानाचा आणि डोळ्याचा मेळच घालता येईना. सी. डी. देशमुखांना तिनें एकदोन वेळां पाहिलें होते व ते रिझर्व्ह बँकेचे गव्हर्नर आहेत हें तिला माहित होतें. पण तिच्या डोळ्यासमोर असलेली व्यक्ती ती ही नव्हती. पण तें खोटें कसें मानायचं ? कारण त्या गृहस्थाची माहिती खुद्द तिचे वडील करून देत होते. पण देशमुखांनीं तिचा गोंधळ ओळखला असला पाहिजे. त्यांनीं तोंडांतली सिगार पुन्हा आणखी थोडा वेळ दूर केली व ते दिनकररावाकडे पहात म्हणाले

" हा घोटाळा नेहमीच होतो मि. जोशी ! अं ऽ– मिस—"

असें अर्धवट म्हणूनच त्यांनीं भैय्यासाहेबाकडे पाहिलें

" अं ऽ मिस् माधवी जोशी ! ही सध्या जे. जे. आर्टस्कूल-मधून फायनल परीक्षेला बसली आहे ! "

"Oh! I am very glad!" असें म्हणून त्यानें तिला नमस्कार केला व नंतर लगेच थांबल्यासारखें करून तो म्हणाला "तुम्ही काय म्हणालांत मि. जोशी, आर्टस्कूलमधून फायनल ! you mean to say Art Master!

"येस!" असें म्हणून दिनकरराव स्वत:शीच हंसले.

"ओ! फारच छान, फारच छान! तुम्ही आर्टिस्ट आहांत तर एकूण? Good! अं ऽ हो, मी तुम्हाला काय सांगत होतों, माझ्या नांवाबद्दल! माझं नांव जरी सी. डी. देशमुख असलं, तरी मी रिझर्व्ह बँकेचा गव्हर्नर नाहीं. असिस्टंट गव्हर्नर आहे. सध्यांच्या गव्हर्नरचं आणि माझं नांव असं एकच आल्यानें कांहीं कांहीं वेळा घोटाळा होतो!"

"पण मला वाटतं तुमचं नांव—" भैयासाहेब उद्गारले.

"येस! शशांक, पण मी माझं स्पेलिंग मुद्दामच Chauchunk असं करतो. अर्थात् मुद्दाम नव्हे, पुष्कळ दिवसापासून! But-अं ऽ I hope it's a trifle matter! काय?"

असें म्हणत तो माधवीकडें पहात हंसला. माधवीला–कां कोण जाणें, पण पहिल्यापासूनच तिचें मत त्या गृहस्थाबद्दल बरोबर झालें नव्हतें; पण दिनकरराव त्याच्याकडें एवढें लक्ष्य देवून एवढया अदबीनें बोलत आहेत तेव्हां आपणही जरा लक्ष्य द्यावें म्हणून ती त्यांच्या संभाषणाकडे पहात होती. पण शेवटीं त्यानें केलेला खुलासा व नंतरचें त्याचें हास्य पाहून तिला थोडेंसें चमत्कारिकच वाटलें.—पण इतक्यांत तिच्या नशीबानें गाडीची शिटी झाली.

"बरं! जपून रहा हं!"

"बरं, ओळख ठेवा!"

गाडी बोरीबंदर व मशीदबंदर सोडून पलिकडे गेली तरी माधवीला त्या गृहस्थाचा खुलासा आठवत होता, व त्याबरोबर तिला भरपूर हंसूही येत होतं!

---

## २ : : स्मृती-सदन

दुसरे दिवशीं सकाळीं ती लोणावळ्याच्या तिच्या 'स्मृती-सदन' मधें होती ! पूर्वेला तांबडे फुटूं लागलें होतें, पण अद्याप उजळा मात्र फुटला नव्हता. घाटामधें जी एक प्रकारची सर्द व विचित्र हवा जाणवते तशीच हवा तिच्या खोलींत आणि आजुबाजूला पसरली होती. ती जागी झाली तेव्हां प्रथम तिला नक्की आठवेनाच कीं आपण कुठें आहोंत तें ! तिनें उजव्या कुशीवरची मान डाव्या कुशीवर वळवली व हात मानेखालीं दुमडून पुन्हा हलकेंच डोळे मिटून घेतलें.

पण एकदां तिची झोप जी उडाली ती कांहीं केल्या परत येण्याचें चिन्ह दिसेना. तिनें बटन लावून पाहिलें. अद्याप पांच वाजत होते, खिडकीचा पडदा दूर करून पाहिलें. बाहेर दाट धुकें पसरलें होतें व त्यांतून आजुबाजूचें कांहींही दिसत नव्हतें.

"ऊं ऽ !"

असें करून तिनें अंगावर रजई ओढली व पुन्हा एकदा मान दुमडून झोपण्याचा सोहळा केला. पण त्यावेळेला तिची झोप मोडली ती एका भलत्याच आवाजानें ! तिला चांगली झोप लागत होती, पण खालच्या मजल्यावर झालेला स्टोव्हचा 'फर्रर' असा आवाज ऐकून ती एकदम आश्चर्यचकित झाली.

"म्हणजे ? आई इतक्या लवकर उठली कीं काय ?"

तिनें पुन्हा बटण दाबलें व आईच्या मच्छरदाणीकडें निरखून पाहिलें. तिची शंका खरी होती ! आतां तिला झोप येणें शक्यच नव्हतें. ती मुकाटयानें उठली व अलगद स्वैंपाकघरांत प्रवेश करत म्हणाली

" आई ! "

तिची हांक ऐकतांच यशोदाबाईंनीं मागें वळून पाहिलें व लगबगीनें त्या तिच्याजवळ येत म्हणाल्या

" हें काय ? तूं कशाला उठलीस हांक मारल्याशिवाय ? "

" हांक मारल्याशिवाय ? " माधवीला आईच्या या बोलण्याचें हंसूच आलें व ती हंसत तिच्याकडें पहात म्हणाली " म्हणजे तूं काय मला समजतेस तरी काय ? पतोडीचा नबाब कां इंदोरचा राज-पुत्र ? आणि मला एवढं सांगणारी आई ! तूं कां लवकर उठलीस ग ?"

यावर यशोदाबाई मंदपणें हंसल्या

" तें तुला कळायचं नाहीं माई ! "

" कळायचं नाहीं ? "

" हो ! "

" म्हणजे ? "

" म्हणजे लग्न झाल्याशिवाय ! "

" चल् तुझं आपलं कांहीं तरीच ! "

सरते शेवटीं आईनें स्वतःला हवा तो विषय काढलाच हें पाहून माधवीनें मान फिरवली व वेणीचें टोक हाताभोवतीं गुंडाळत ती भर्रकन न्हाणी घराकडे निघून गेली. यशोदाबाई तिच्या त्या बालिश हालचालीकडें पहातच राहिल्या व ती गेल्यावर कॉफीचें पातेलें उच-लत त्या स्वतःशी म्हणाल्या

" संस्थानचा राजपुत्र काय तुझ्यापुढें ग पोरी ! "

आणि आपल्या या बोलण्याचें प्रत्यंतर यशोदाबाईंना पुन्हा आणखी थोडयाच वेळांत आलें. कॉफी होतांच माधवी प्रसाधन भूषिकेसमोर जाऊन उभी राहिली व सर्व जामानिमा नीट करून पदर व्यवस्थित गुंडाळून निळ्या ब्लेझरचा कोट घालून ती यशोदाबाईसमोर जाऊन उभी राहिली तेव्हां यशोदाबाईंना सुद्धां वाटलें कीं ' किती ही पोर सुंदर दिसतेय् ! '

मोतीया रंगाची साडी पेहरून त्यावर अस्मानी किनारचा ब्लाऊझ तिनें चढवला होता व त्या पेहरावांत तिची गव्हाळ अंग-कांति फार खुलून दिसत होती. चेहऱ्यावर लिंबासारखी सतेज चमक होती. तर कपोलाचा रक्तिमा एकाद्या नुकत्याच कांपलेल्या कलमी आंब्याच्या फेकाप्रमाणें मोहक भासत होता. नारिंगाच्या उघडलेल्या आणि विस्फुरलेल्या लालसर दाण्याप्रमाणें डोळे पाणीदार आणि आकर्षक भासत होते.

फिरतांना यशोदाबाई सारख्या तिच्याकडें पहात होत्या व त्यांच्या सारखं मनांत येत होतं कीं ' माधवीला आपण जरा आणखी साधं रहाण्याची सूचना दिली पाहिजे. ' पूर्व तर एकादी आग लाग-ल्याप्रमाणें झगझगाटत होती व त्यांतून पुढचें धुके. पुढचा अजमास घेतांना माधवीची बरीच तिरपीट उडत होती. माथेरान पॉईंटसपर्यन्त आल्यानंतर माधवी म्हणाली ' आतां मागें फिरूं या व थोडसं रेल्वे लाईननें जाऊं ! '

यशोदाबाई कांहींच बोलल्या नाहींत, पण त्यांनीं आपले पाय वळवले. लोणावळयाला आज त्यासुद्धां बऱ्याच दिवसानें येत होत्या

व त्यामुळें तेथील सृष्टीसौंदर्य आणि शांतता यामुळें त्यांना अमूप आनंद झाला होता. वळण घेतां घेतां माधवी छोटया छोटया रस्त्यानें चालूं लागली व असेंच एक मोठें वळण घेऊन ती एकदमच एका नवीनच पॉईंटच्या टोकाला आल्याप्रमाणें झाली तेव्हां समोरील दृश्य पाहून तिला एकदम विलक्षण आल्हाद वाटला.

सह्याद्रीचा कडा तेथें एकदम अचानक किंवा नवीनच तुटल्याप्रमाणें दिसत होता व त्याच्या समोर सुमारे दोनशें फुटावर त्याच समांतर रेषेंत दोन काळेकभिन्न कातळ त्रिकोणाकृति पसरलेले दिसत होते व त्याच त्रिकोणांतून आतां सूर्यबिंब बाहेर येताना दिसत होतें. माधवीला मोठी मौज वाटली तें दृश्य पाहून ! दूरवर क्षितिजावर कडेचा भाग एकाद्या रुपेरी पट्टयाप्रमाणें प्रकाशमान झालेला होता, तर त्याच्या पासून वर कित्येक दूरपर्यंत नुसते काळे ढगच पसरलेले होते.

त्या पॉईंटच्या टोकाशी एक छोटीशी एकमजली टुमदार इमारत होती. छपरावर गोकर्णीचे वेल लोंबत होते व कुंपणांतहि ठिकठिकाणीं फुलझाडांचे निरनिराळे ताटवे फुललेले होते. भोवतीं सर्वत्र तांबडी वाळू पसरलेली होती व रात्रीं नुकत्याच पडून गेलेल्या सरीच्या थेंबांनीं मातीला एकप्रकारचा विलक्षण दर्प येत होता. माधवीला फारच आवडली ती जागा व हाताची तर्जनी ओठावर जुळवत ती व्यामोहानें त्याच्याकडे पहात राहिली.

पण त्यानंतर थोडा प्रकाश अधिक उजळल्यानंतर तिचें लक्ष्य त्या बंगल्याच्या तिरप्या कोनाकडें गेलें व तिथें तिला जें दिसलें तें पाहून तिला थोडासा धक्काच बसल्याप्रमाणें झाला. तिथें एक कुंजासारखी एक पुरुषभर उंचीची थोडी दाट झाडी होती. त्याच्या आंत

सबंध फरशी होती. व त्याच्या आंत सुमारे सहा फूट उंचीचा एक दणकट आणि निरोगी तरुण सूर्याला अभिमुख होऊन शास्त्रीय पद्ध-तीनें नमस्कार घालत होता.

सूर्याचे उगवते किरण त्याच्या अंगावर पडत होते व त्यांच्यांत त्याची गौरकांति आणि सुदृढता फार विशेष प्रमाणांत दिसून येत होती. त्याचें श्वसन अगदीं व्यवस्थित चाललें होतें व नमस्कारांत तो पूर्ण प्राणायामही साधत होता असें दिसलें. त्याच्या कृतींत कोणत्याही प्रकारची घाई नव्हती व चेहरा इतका शांत होता कीं माधवीला खरो-खरच नवल वाटलें !

—पण दुसऱ्या क्षणी तिनें जें पाहिलें त्यामुळें ती आणखी आश्चर्यचकित झाली—

---

## ३. : : माथेरान-

रात्र अंधारी झाली होती. आकाशांत तारा एकही दिसत नव्हता. सुमारे नऊ वाजून गेले असावेत. विद्याधर स्टेशनवरून निघाला तो मोठया घाईघाईनें आपल्या कॉटेजकडे वळला. त्याचे डोळे जड झाले होते व पावलेंही फार जड पडत होतीं. एक हातानें त्यानें बॅटरी धरली होती व कसाबसा तोल सांभाळत तो रस्त्यानें चालला होता.

क्वॉर्टरमधें आल्यावर त्यानें भराभरा कपडे काढले व कसाबसा गाऊन चढवून तो बिछान्यावर पडला. भोवतालीं किर्रर काळोख पसरला होता व पडदा सारून खिडकीच्या कांचेतून बाहेर पाहिलें तरीही काजव्यांच्या चमचमण्याखेरीज कांहींच दिसत नव्हतें. तळाशीं वाहणाऱ्या ओहळाचा झुळझुळ आवाज येत होता व त्या घुमटींत आणि समोरच्या कातळांवर घुमणाऱ्या रातकिडयांचा मात्र कर्कश आवाज ऐकू येत होता. काजव्याची झांपच्या झांप अठरा अठरा वीस वीस फूट एकदम चमके व क्षणांत दिसेनाशी होई. नवीन माणसाला त्याचें महत्व होतें पण विद्याधरला त्यांत कांहींच स्वारस्य वाटलें नाहीं.

तो आज भयंकर दमून गेला होता व त्याला अगदीं गळाटल्यासारखें वाटत होतें. माथेरानचा तो 'बॉल' अद्याप त्याच्या नजरेसमोर नाचत होता व त्यावेळेला डोरोथीनें केलेले ते पैंजणांचे आवाज अद्याप त्याच्या मस्तकांत घुमत होते ! गेल्या कित्येक वर्षांत तो कोणत्याच अनोळखी तरुणीच्या इतक्या सान्निध्यांत गेला नव्हता व आंग्ल

तरुणी इतक्या मोकळेपणानें बाकीच्यांशी मिसळूं शकतात व बोलूं शकतात हें पाहून त्याला कमालीचें आश्चर्य वाटलें होतें. जे देखावे आणि जे उत्तान प्रसंग फक्त पडद्यावरच पहायला मिळू शकतात त्या सर्व विस्मयकारक सृष्टींत तो आज स्वत: वावरला होता. त्याचीं सर्व गात्रें बधिर होऊन गेलीं होतीं. स्त्रीसहवास आणि स्त्रीस्पर्श यांचा त्यानें आज उत्तान अनुभव घेतला होता व त्या रोमहर्षक आठवणी अद्याप त्याच्या नजरेसमोर तरंगत होत्या.

क्लबमध्यें शिरल्यावर डोरोथीनें आपल्या कित्येक मित्र-मैत्रिणींशी त्याच्या ओळखी करून दिल्या होत्या व ते सर्व अत्यंत मनमोकळे-पणानें त्याच्याशी वागत होते. डोरोथी म्हणजे सौंदर्याची अभिजात मूसच होती व नुसतें सौंदर्यच नव्हे तर त्याबरोबर तिच्या निरनि-राळ्या चांगुलपणाबद्दलही ती फार प्रख्यात होती. माथेरान बॉल युनिअनमध्यें तिला चांगलाच मान होता असें दिसलें व तिचा मित्र म्हणून विद्याधरलाही तिथें फार मान देण्यांत येत होता.

विद्याधरला इंग्लिश पद्धतीचें नृत्य म्हणजे नवीन गोष्ट होती अशांतलो भाग नव्हता. कॉलेजच्या सभासंमेलनासाठीं त्यानें त्याचा अभ्यास केला होता, पण अशा तऱ्हेनें प्रत्यक्ष जीवनांत अशा तऱ्हेची पाळी येईल याची मात्र त्याला कल्पना नव्हती. बॉल सुरू झाला तसें डोरोथीनें त्याला गप्पांतून हात धरून उठवलें व मंजुळ पदविन्यास करत ती हॉल मध्यें शिरली.

बॅन्ड वाजत होता व त्याच्या पद्धतावर अनेक जोडपीं तेथें वर्तु-लाकार फिरत होतीं.

" चल विद्या ! Dont be shy हं ! "

डोरोथीनें त्याला ओढलें व थोडयाच वेळांत विद्याधरला असें वाटूं लागलें कीं हें सारें खरें आहे कीं स्वप्न आहे. त्याच्या गोऱ्यापान भुजाच्या वेळाव्यांत डोरोथी हलकेच नाचत होती. तिच्या विलोल चेहऱ्यावर थोडेफार धर्मबिंदू डोकावू लागले होते व बँडच्या गतिमानानें त्यांचा वेग कमी जास्ती होई तसें तिचे पुष्ट उरोज वेगानें स्पंदन घेत असल्याचें विद्याधरला दिसून येत होतें. पिवळ्या रेशमी रंगाचा फ्रॉक तिनें पेहरला होता व कॉलरच्या उघडया भागांतून तिची गोरीपान जी अंगकांति दिसे ती फारच मनोवेधक भासत होती. त्यावर गुलाबी झाकाच्या टपोर मोत्यांची माळ तिनें घातली होती व कॉलरला लावलेल्या निरनिराळ्या कापडांच्या फुलांतून हलकेच वर डोकावणाऱ्या तिचा मानेचा भाग म्हणजे एकाद्या राजहंसाप्रमाणें शुभ्र आणि आकर्षक भासत होता.

ओठावर तिनें निळ्या रंगाची लिपस्टीक घातली होती व त्या साऱ्या पदविन्यासांतही ती सारखी विद्याधराकडें पाहून हंसत होती. तिचा चेहरा विद्याधरच्या तोंडापासून अत्यंत जवळच्या अंतरावर होता व तिच्या चेहऱ्यावर उमटणारे निरागस भाव विद्याधरला चांगलेच दिसत होते. विद्याधरच्या सान्निध्यांत ती नेहमीच खूष असे पण आज तिच्या खुषींत कांहीं विशेष होतें. तिची चर्या अत्यंत प्रसन्न होती व क्षणो-क्षणीं विद्याधरच्या चेहऱ्याकडे पाहून तिच्या मनांत येई

" किती मोहक आणि बळकट आहे हा ! "

सुरवातीला विद्याधर थोडासा अडखळला पण नंतरची त्याचीं पावलें बरीचशीं समाधानकारक पडत होतीं.

" किती लबाड आहेस रे तूं ?" थोडया वेळानें डोरीथी उद्गारली.

" कां ? काय झालं ? "

" इतकं व्यवस्थित तुला नाचता येतं, आणि तूं मला सांगत होतास—"

" पण मला हें माहित नव्हतं कीं ह्या नाचालाच ' व्यवस्थित नाच ' म्हणतात हें ! नाहींतर मी सांगितलें असतें, कीं—"

" चल ! पुरता चावट आहेस तूं ! "

थोडयाशा क्रोधावेशानेंच डोरोथी उद्गारली. पण थोडया वेळानें ती आणखी पुढें म्हणाली

" काय रे ? ती कालची पोरगी कोण ? "

" कोणती कालची पोरगी ? "

" ती ! काल सकाळीं मी टॉमला घेऊन तुझ्या क्वार्टरमध्यें शिरलें त्यावेळीं तुझ्या घरासमोरच्या कोपऱ्यावर उभी होती ती ! तिच्याबरोबर एक वयस्क स्त्रीही होती ! त्यावेळेला तुझा तो ' रबिश् ' व्यायाम चालला होता, व त्या तुझ्या नमस्काराच्या हातवाऱ्याकडे ती अगदीं डोळे विस्फारून पहात होती !"

" खबरदार, माझ्या नमस्काराला ' रबिश् ' म्हणशील तर ! " विद्याधर तिला दटावत म्हणाला " मग मी ह्या तुमच्या बॉलला 'चाइल्डीश' म्हणू शकेन !"

" जरूर म्हण ! " डोरोथी हंसून त्याला उत्तर देत म्हणाली "बॉल एवढयाकरतांच असतो कीं माणसानें आपलें वय विसरून थोडें मागें जावें. आणि पोरासारखें उडया मारणें तर आम्ही कधींच गैर समजत नाहीं !"

" समजलं, समजलं ! फार हुशार आहेस ! "

यावर डोरोथी प्रच्छन्नपणें हंसली होती. हॉलमधल्या रंगीबेरंगी दिव्यांचा प्रकाश सारखा तिच्या चेहऱ्यावरून फिरत होता व दरवेळीं त्याची आकर्षकता नवनवे अभिनिवेश दाखवत होती. हॉलला सगळ्या बाजूंनीं आरसे होते व त्या झगझगीत आणि रंगीत प्रकाशांत त्या सर्वांच्या प्रतिमा एकसमयावच्छेदेंकरून तेथें दिसत कीं विद्याधर तें दृश्य पाहून स्तिमित होत होता.

" ती पोरगी मला फारच सुंदर वाटला रे विद्याधर ! " डोरोथी पुन्हा बोलूं लागली " काल संध्याकाळीं इंन्स्टिटस्ठ्युटमधून मी, तूं, जॉन ग्रेगरी, पपा, हेरिंग आणि पॉवेल परत येत होतों त्यावेळींसुद्धां लायब्ररीच्या कोपऱ्यावर मी तिला आणि तिच्या आईला पाहिलं. सारीमध्यें, तुमच्या हिंदी स्त्रिया किती सुंदर दिसतात आणि तें कपाळावरचं कुंकू—विद्याधर, खरंच तूं कुंकू मला कधीं आणून देणार ?"

" कुंकू ! तुला तें लावणारा लौकर येईल अं ! थांब ! मी पॉवेलला सांगतों अं !"

" चल् ! चावट ! " त्याच्या बोलण्याचा अर्थ डोरोथीच्या लक्ष्यांत आला व ती गाल फुगवत म्हणाली.

"आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं आज सकाळींही मला ती तुझ्या बंगल्याच्या कोपऱ्यावर दिसली ! "

डोरोथी यावर कांहीं न बोलतां स्तब्ध राहिली. बर्फाच्या कडयाचा एकादा भाग तेजस्वी दिसावा त्याप्रमाणें तिचें मुखमंडल शुभ्र आणि मोहक दिसत होतें व एकाद्या वेलीप्रमाणें तिची देहलता

विद्याधरच्या पुढयांत लवलवत होती. विद्याला उन्माद चढल्याप्रमाणें झालें होतें व डोरोथीही बेहोष झाल्याप्रमाणें दिसत होती. सर्पाप्रमाणें तिची अंगकांति चकाकत होती व क्रमाक्रमानें उन्नत होत गेलेल्या तिच्या मोकळ्या आणि भरदार पोटऱ्या—

बॅन्डच्या सुरांनीं नवीन ताल घेतला व डोरोथीनें विद्याला जोडी बदलायची सूचना दिली. विद्याची साथी म्हणून ह्यावेळेला आलेली नवीन पोरगी मिस नील्स. माथेरांनची किंडरगार्टन मिस्ट्रेस होती ती ! त्यानंतरही विद्याधरला आणखी दोन 'चेंजेस्' घ्याव्या लागल्या व त्या आंग्ल युवतींचा तो प्रणयरम्य मोकळेपणा पाहून विद्याधर अगदीं स्तिमित होऊन गेला होता.

बॉल संपला तशी टेबलाभोवतीं एकच गर्दी झाली. बाटल्या फुटत होत्या. बुचें उडत होतीं व मद्यार्काचा एक विचित्र दर्प तिथें दरवळूं लागला. विद्याधर एका टेबलापाशी बसला होता व डोरोथीनें मागून येऊन त्याला स्पर्श केला. विद्यानें वळून पाहिलें—तों ती हातांत दोन पेले धरून उभी होती.

"Vidyadhar, To Today's Sweet & Lovely Memories!"

"तुझं अभीष्ट-चिंतन स्वीकारतों डोरोथी, but I regret I cannot accept this glass!"

"विद्याधर—!"

"या बाबतींत मला आग्रह निरुपयोगी आहे डोरोथी, माझा स्वभाव तुला माहितीच आहे!"

डोरोथीच्या वृत्ती बेभान झाल्या होत्या. तिनें ते दोन्हीही पेग घेतले व विद्याला घेऊन ती ड्रेसिंग-केबिनमधें गेली. तिनें आपली

केशभूषा व्यवस्थित केली, चेहऱ्यावर पफ फिरवला व नंतर आपले कपडे बदलण्यास सुरवात केली. विद्या लाजला, कमालीचा गोंधळला.

" डोरोथी ! "

" Dont be shy Vidya, & especialey when I am pleased to have these positions ! मला उलट त्यांत आनंद वाटतो आहे ! "

आणि विद्याधरला आतां आठवत होतें कीं ' स्त्री-सौंदर्य ' म्हणजे काय याचा त्यानें आज प्रत्यक्ष अनुभव घेतला होता. डोरोथी निस्संकोचपणें आपल्या कपडयांची अदलाबदल करत होती व तसें करतांना तिच्या निरनिराळ्या अंगप्रत्यंगाचें दर्शन जें विद्याधरला घडत होतें त्यावरून तो स्वतःशी म्हणत होता " किती असामान्य आणि सुंदर आहे ही डोरा ? "

कपडे बदलून ती तयार झाली व नंतर त्याचा हात हातांत घेत म्हणाली

" चल विद्या, उशिर झाला. लोणावळ्यांत पोंचेपर्यंत रात्र होईल ! "

आणि वाटेंत ती सारखी बोलत होती. ' हिंदी स्त्रिया आणि त्यांचें सौंदर्य ' याशिवाय तिला दुसरें सुचत नव्हतें व विद्याधरला ती सारखी ' त्या कोपऱ्यावरच्या पोरीची ' आठवण देत होती !

विद्याधरनेंही ती तरुणी पाहिली होती व त्यालाहि तिची चांगलीच आठवण होती.

" कोण असेल बुवा ही ?"

अखेर कॉटला हेलकावे देत तो स्वतःशी उद्गारला.

---

## ४ : : ट्रॉलीवर

आणि टनेल नं. चार G. I. P. SE Mile- stone 82I3I4 पाशी काम करायला तो दुसऱ्या दिवशीं सायंकाळच्या सुमारास आला तेव्हां तीच पोरगी त्याला दिसली आणि तो कमालीचा आश्चर्य-चकित झाला.

सायंकाळीं चारच्या सुमाराला त्याला इंजिनीअरकडून मेसेज आला कीं रात्रीं जनरल मॅनेजरचा सलून फोर डाऊननें मनमाडला जाणार आहे व त्याच्याकरता त्यानें त्याच्या सेक्शनमध्यें चक्कर मारावी व नेहमी धोका देणारे ८१ ते ८३ चें अंतर जास्त काळजीपूर्वक पाहावें.

त्याप्रमाणें तो ट्रॉलीवरून चालला होता. त्यानें घाटांतला आपला विभाग नीट पाहिला व नंतर ८२ च्या उरलेल्या भागासाठीं तो थोडासा 'अप साईडला' आला. ट्रॉली धावत होती. रूळाचें अंतर सपासप कापलें जात होतें. पश्चिमेकडून भुईभुई धावणारा वारा विद्याधरला फार सुखद वाटत होता. सह्याद्रिचा अजस्त्र घाट थोडया प्रमाणांत एका बाजूला दिसत होता व एका बाजूला लोणावळ्याची गांवाबाहेरची वस्ती दिसत होती. विद्याधर डौलांत चालला. त्याचे हेलकरी त्याच्यामागून त्याच्या चौचाकीला पळवत होते व त्याला वेग आला कीं ते पटकन् त्याच्यावर चढून उभे रहात.

विद्याधरची नजर भेदक होती व तो काळजीपूर्वक लाईनची पहाणी करत होता. नेत्रानें तो त्या रूळांच्या अजस्त्र फिटींग्जकडे पहात होता पण मनानें तो विचार करत होता.

" खरंच, काल आणि परवा दोन दिवस आपल्या घराच्या कोपऱ्यावर येऊन उभी रहाणारी ती नवयौवना कोण ? "

परवाच्या दिवशीं तो आपल्या आसनांच्या जागीं नमस्कार घालत होता. त्याला थोडासा उशिरच झाला होता व तो थोडासा विमनस्कच होता. गेटचें फाटक वाजलें म्हणून त्यानें वळून पाहिलें. डोरोथी आंत येऊन पुन्हा फाटक ओढून घेत होती.

" विद्या पुरे रे ! " ती आंत आल्यावर ओरडली व व्हरांडयाचा पुढचा दरवाजा ओढून आंत शिरली.

विद्यानें टॉवेलनें आपलें अंग पुसले व नंतर तेथेंच बाहेर दगडी कोचावर उभे रहात तो ओरडला

" तूं कशाला आलीस डोरा ? "

" मी केक्स आणि कॉफी घेऊन आलें आहे तुझ्यासाठीं ! "

" इकडेच ये मग ! "

डोरोथी आली व आतां विद्याधरचें लक्ष्य फाटकाबाहेरच्या त्या तरूणीवर गेलें. धुकें अद्याप पुरतें निवळलें नव्हतें, पण पूर्वेकडून सोनेरी प्रकाशाचे जे पट्टे तिच्या चेहऱ्यावर पडत त्यामुळें विद्याधरला कळून आलें कीं ती बरीच आकर्षक आहे. तिचें उत्तरीय आणि तिचा केशालाप पहाडापासून वहाणाऱ्या वाऱ्यामुळें फडफडत होता व ओठावर तर्जनी ठेवून ती क्षणांत समोरच्या रम्य वनश्रीकडे

पाहीं तर क्षणांत विद्याधरच्या क्वार्टरकडे तिचें लक्ष्य जाई. सौंदर्याच्या बाबतींत विद्या जास्त चिकित्सक होता, पण त्यालाही असें वाटलें कीं ह्या तरुणीच्या सौंदर्यांत आरोग्य व रेखीवपणा यांचा मिलाफ फार सुंदर तऱ्हेनें झालेला आहे. तिच्या चेहऱ्यावर निरागस कांति होती व हालचालींत अद्याप बालिशपणा व खोडकरपणा दिसत होता.

डोरोथीचें आगमन तिला पसंत पडलें नसावें असें दिसलें. कारण कॉफीची केटली आणि केकची बशी घेऊन डोरोथी बाहेरच्या लताकुंजांत आली तशी एकदम तिनें मान फिरवली व थोडयाच वेळांत ती तेथून निघूनही गेली.—त्यानंतर ती विद्याला पुन्हा संध्या-काळीं दिसली, तो डोरोथीनें सांगितल्याप्रमाणें इन्स्टिटयुटमधून परत येत असतांना! त्यानंतर पुन्हा ती डोरोथीला दिसली होती दुसरें दिवशीं सकाळीं!

त्यानंतर मात्र विद्याधरला ती दिसली नव्हती. विद्याधर ट्रॉलीवरून धांवत होता, पण त्याच्या डोळ्यासमोर ती रम्य आकृति नाचत होती. तिचे भुरूभुरू उडणारे केस, हंसरी व मधुर मुद्रा—

वळणावर ट्रॉली वळली व समोर जेव्हां विद्याधरनें पुन्हां तीच तरुणी पाहिली, तेव्हां मात्र त्याच्या तोंडातून एक आश्चर्योद्गार निघून गेला. अरुंद आणि चिंचोळ्या भागावरून रेल्वे लाईन धावत होती व त्याच्या आसपास पठाराचे लहान मोठे भाग इतस्ततः विखुरले होते. असाच अेक रेल्वेलाईनच्या बाजूचा मोठा भाग पाहून माधवी बसली होती. तिच्या समोर घाटमाथ्याचा एक मोठा सुळका वर गेला होता व त्याच्या माथ्यावरून सुमारे चार फूट रूंदीचा एक जलप्रवाह खालीं दोनशे फूट उडी घेत होता व प्रवासी चित्रकाराला

फार मजेचा वाटावा असाच तो देखावा होता. विद्याधरला स्वतःला तो देखावा फार आवडत होता व त्याच्या शांततेच्या वेळीं क्वचित् प्रसंगीं तोही इथें येऊन बसत असे.

माधवी शिलातलावर बसली होती. कॅनव्हासचा बोर्ड तिच्या समोर उभा होता व ती एकाग्र चित्तानें समोरच्या देखाव्याचें स्केच करून घेत होती. सूर्य मावळत चालला होता व समोरच्या देखाव्याचें पूर्ण स्पष्टीकरण करणें जड होत होतें. काम पुरें करावें कीं काय अशा विचारांत ती होती तोंच समोरून ट्रॉली येताना तिला दिसली व आश्चर्याची गोष्ट कीं ट्रॉलीवर तिला विद्याधर दिसत होता.

विद्याधरचा क्वार्टर व त्याचा पेशा पाहून तिला कल्पना होतीच कीं हा कुणीतरी रेल्वेनोकर असावा व आज तिची शंका पर्यायानें खरी ठरत होती. तिनें हलकेच कॅनव्हास गुंडाळला व सारें सामान आवरून ठेवीत ती समोरच्या देखाव्याकडे पाहूं लागली.

ट्रॉली आली व तिच्या समोरच थांबली. विद्याधर खालीं उतरला. त्यानें लाइनीची पहाणी केली. अेकदोन फिश–प्लेटस् त्यानें घट्ट करायला सांगितल्या व त्या लोकांच्या कामावर देखरेख करत तो सभोंवार हिंडू लागला. त्याचे डोळे नकळत त्या लाईनच्या पश्चिम-भागाला वळत होते पण माधवी स्वतः ज्याअर्थीं स्वब्ध होती त्याअर्थीं आपणच होऊन कांहीं सुरवात करावी हें त्याला बरं वाटेना.

सुमारे दहा मिनिटांत त्याचें तिथलें काम आटोपलें व तो गॅंगमन्सना म्हणाला

“ आटपा, आतां झटकन् तेवढें पुढचें वळण घेऊन येऊं म्हणजे झालं !”

त्याच्या लोकांनीं आपलीं हत्यारें आवरलीं व विद्याधर ट्रॉलीवर चढणार इतक्यांत त्याला ती तरुणी पुढें आल्याप्रमाणें वाटली. त्यानें मागें वळून पाहिलें व आपला एक पाय तसाच वर ठेवीत तो म्हणाला,

" काय ? "

" तुम्ही त्या पुढच्या वळणावर जाऊन येणार आहांत ? "

" होय ! "

" मग मी तुम्हाला एक तसदी देऊ कां ? "

विद्याधरानें प्रश्नार्थक चेहरा केला.

" मी चित्रकार आहे, आणि या देखाव्याचा स्केच काढण्याचा प्रयत्न करते आहे. मला हा ' व्हयू ' फार आवडला. हा या कलत्या-बाजूने इतका सुंदर दिसतो तर त्या वळणानंतर किती छान दिसत असेल याची मी कल्पना केली ! पण इतक्या दूरवर मी अशा ठिकाणीं सोबतीविना चालत जाणें मला योग्य वाटेना ! "

" आपणांस तिकडे येण्याची इच्छा आहे काय ?"

माधवीनें मान डोलावली.

" या ना मग ! "

82/4 SE वरून त्यानंतर जी ट्रॉली निघाली ती त्या दोघांना घेऊन निघाली.

---

" फार वेळ जागत बसू नकोस ग ! "

" छे ! छे ! फार झालं तर एक तासभर ! "

" हं " असें करून यशोदाबाई कॉटवर पडल्या व अंगावर त्यांनीं रजई ओढून घेतली. त्यांना झोप आली होती, डोळे मिटत होते पण पडल्या पडल्याही डोळे किलकिले करून त्या माधवीकडे पहात होत्या.

माधवी टेबलापाशी बसली होती. समोरच्या टेबल-लँपचा प्रखर प्रकाश तिच्या चेहऱ्यावरून वहात होता व मान खालीं घालून टपोरदार वळणें काढीत ती रोजनिशी लिहण्यांत मग्न होऊन गेली होती. मध्येंच ती थोडीशी थांबे, पेन तिच्या गालावरून केशालापापर्यंत घसरे. हिऱ्याचीं कर्णफुलें थोडींशी बाजूला हींत व पुन्हा लगेच ती लेखनांत गुंग होऊन जाई.

—" आज दुपारीं मी विद्याधरच्या बंगल्याकडें गेलें होतें. ते टेबलापाशी वाकून कांहींतरी लिहण्यांत अगदीं एकतान होऊन गेले होते. मी पुढें होऊन पाहिलें. टेबलाला माझा हात लागतांच बांगडीचा आवाज झाला व त्यांनीं दचकून वर पाहिलें.

त्यांच्या लिहण्याच्या टेबलला समोर मोठा आरसा होता. त्यांत त्यांचें प्रतिबिंब उमटलें होतें. त्यांच्यामागें माझें प्रतिबिंब उमटलें होतें..

किती मनोहर आणि लोकविलक्षण दृश्य दिसत होतें तें ! मला थोडेंसें चोरट्यासारखेंच झालें पण एका विचित्र विचारानें मला मोहित केलें व तो म्हणजे 'या दृश्याचा फोटो घेतला तर ?' इश्श !– पण मी हें काय लिहितें आहे.

रेल्वेच्या ८२।४ ह्या मैलाच्या दगडावरून जो देखावा दिसतो त्याला 'डेझर्ट फॉल' असें नांव असल्याचें विद्याधरनें मला सांगितलें. कारण तो 'फॉल' बाराही महिनें वहात असतो व उन्हाळ्यांत त्याची धार थोडीशी बारीक होते एवढेंच ! आतांसुद्धा उन्हाळाच आहे. आम्ही इतक्या थंड हवेंत आहोंत व माझ्या खोलीच्या खिडक्या पडदे बाजूला सारून मोकळ्या टाकल्या आहेत तरीसुद्धां मला थोडेंसें उकडल्यासारखेंच वाटते आहे व अशा स्थितींतही त्या फॉलची मनोरम रुंदी अद्याप थोडीही कमी झालेली नाहीं असें म्हणतात. व मला त्याचें फार आश्चर्य वाटतें. तरी पण 'डेझर्टफॉल' हें नांव थोडेंसें चमत्कारिकच नाहीं का ? मी विद्याधरांना विचारलें पण, पण ते उत्तराऐवजी थोडेसें हंसले मात्र !

त्यांचा पेशा आणि त्यांचें जीवन मला फार आवडलें. रेल्वेंत रूळावर देखरेख करणारे ते इन्स्पेक्टर आहेत व त्यांना त्यांच्या सोयीप्रमाणें कामावर जाण्याची परवानगी आहे. आणि काम तरी काय ? तर निसर्गशोभेनें नटलेल्या त्या घाटांतून हिंडायचें. त्यांचा बंगला सुंदर ठिकाणीं तर आहेच, पण बाहेरून दिसतो त्यापेक्षां तो आंतून सुंदर आहे. विद्याधर एकटे असतात तरी तेथील स्वच्छता अवर्णनीय आहे व विद्याधरांना फुलांचें भारी वेड आहे. त्यांच्या दारांना आणि

खिडक्यांना खसतट्टयांचे पडदे बसवलेले आहेत व त्यामुळें घरांत सर्वत्र त्यांचा वास पसरलेला असतो.

माझें ‘ डेझर्ट फॉलचें ’ चित्र पुरें झालें आहे. चित्र फारच चांगलें निघालें आहे असें विद्याधर म्हणतात पण मला तें खरं वाटत नाहीं ! त्यांनीं मोठ्या हौसेनें त्याचा फोटो घेतला व त्याची एक छोटी कॉपी त्यांनीं टेबलवरच्या फ्रेममध्यें बसवलेली आहे. हा फोटो मात्र खरोखर फार सुंदर आला आहे. विद्याधरांनीं सुद्धां हें मान्य केलं, पण त्यांत माझ्या चित्रकलेपेक्षां त्यांच्या फोटोग्राफीचंच कौशल्य जास्त नाहीं कां ? हें विद्याधरांना मान्य नाहीं व ते जें म्हणतात तें मला मान्य नाहीं.

आणि तें चित्र त्यांच्या म्हणण्याप्रमाणें जरी सुंदर निघालेलें असलें तरी त्याच्या श्रेयाचा बराचसा वाटा त्यांच्याकडेच जातो. त्यांनीं मला त्या फॉलच्या देखाव्याची दुसरी बाजू जर ट्रॉलीवर नेऊन दाखवली नसती तर इतकी सुंदर कलाकृती माझ्या हातून झाली असती कीं नाहीं कुणास ठाऊक ? त्यामुळें मला त्या देखाव्याची नीट कल्पना आली.

त्या दिवशीं त्यांची ट्रॉली आली व मी ओळखलें कीं त्यांच्या बंगल्यासमोरचा नवा पॉईन्ट पहाण्यासाठीं आपण दोन दिवस त्या निसर्गशोभेच्या नादीं लागून जात होतों त्या बंगल्यांत नमस्कार घालणारे तरुण ते हेच !—मी त्यांना विचारलें व त्यांनीं तत्परतेनें मला त्या वळणापलीकडे नेण्याचें कबूल केलें. मी अशा प्रकारची विनंती आजपर्यंत कुठें केली नव्हती, त्यामुळें मला थोडेसें संकोचल्याप्रमाणें वाटत होतें व मी विचार करत होतें कीं ‘ माझ्या अंगांत इतका धीटपणा आला कोठून !’

" आपण येथें नवीनच आलेले दिसता ? "

ट्रॉली चालू झाल्यावर कांहीं वेळानें त्यांनीं मला विचारलें.

" हो. "

" कुठें असता आपण ? "

" मुंबईला "

" अस्सं ? कुठें हायस्कुलांत कां जात असता आपण ? "

मला हंशाची उकळीच आली. मी ती मोठया प्रयासानें दाबून ठेवली व थोडेंसें तिरप्या नजरेनें त्यांच्याकडे पाहिलें. त्यांनीं असला चमत्कारिक प्रश्न मला विचारावा याची थोडीशी गंमतच वाटली मला—तरी पण मी दडपून ठोकून दिलें

" हो ! "

सूर्य मावळत चालला होता व त्याचे शेवटचे किरण त्या जंगल पठारांतील पानाफुलांवरून चमकत ते पहाण्यांत मोठा आल्हाद वाटे. ट्रॉली म्हणजे एक स्वतंत्र आगगाडीच नव्हे कां ! निदान मला तरी तो प्रवास फार सुखकर वाटला. लाईनच्या दोन्ही बाजूला रान-फुलांनीं चिकार गर्दी केली होती व त्यांचा उग्र दर्प त्या वेळेला कसासाच वाटत होता. वळणावरून ट्रॉली धावू लागली तेव्हां हेलकाव्यांनीं तिला प्रथमच वेग दिला व नंतर ते तिच्यावर उभे राहिले. मला थोडीशी भितीच वाटली. दोन्ही बाजूला प्रचंड खोऱ्या पसरल्या होत्या व जर कां ट्रालीचें एकादें चाक चुकून निसटलें तर—

माझ्या या कल्पनेनें दचकून मी विद्याधरकडे पाहिलें. ते कसल्यातरी विचारांत गुंतले होते व बेदरकारपणें पुढच्या दृश्याकडे

पहात होते. त्यांना असल्या गोष्टीची संवयच असावी असें दिसलें. तरी पण त्या क्षणीं त्यांच्या त्या धैर्याची मला असूया वाटली. वाऱ्यानें त्यांचे केस भिरभिरत होते. कॉलर फडफडत होती, हाताच्या बाहीचे बटन सुटून साफा उघडा पडला होता व त्यांतून दिसणारे त्यांचे तरारलेले स्नायू—

वळणावर आम्ही थांबलों व 'डेसर्ट फॉलचा' दुसरा देखावा मी पाहिला. तो देखावा मी माझ्या जन्मांत विसरणार नाहीं. फॉल-खालीं त्याच्या तुषाराचे कणशः तुकडे उडत होते व बर्फाचे कण जसें चकाकत उडावेत त्याप्रमाणें तो भासत होता. वरून तो वेगांत धाव घेइ तसा मध्यावर एकादा चांदीच्या वितळलेल्या रसाचा रूपेरी ओहोळ वहात आहे असें वाटे ! –पण सुरवातीच्या त्याच्या भागावर सूर्याचे सोनेरी किरण जसजसे केंद्रीभूत होत गेले तसतसे त्या चांदीच्या ओहोळाचें रूपांतर सोन्याच्या ओहोळांत झालें व त्याची शोभा फार अवर्णनीय दिसूं लागली. मुशींतून काढलेलें नवीन सोनें चकाकावें त्याप्रमाणें त्याची दीप्ती होती व ती पाहून मी अगदीं दिपून गेलें.

" ओ ऽ हो ! " माझ्या शेजारच्या विद्याधरांनीं सुद्धां आश्चर्योद्गार काढला. त्यावेळेला त्यांनीं केलेली मुद्रा—

—आज दुपारीं मी आरशांतल्या त्यांच्या प्रतिबिंबाकडे पाहिलें तेव्हांही मला तीच चर्या दिसली. त्यांना अत्यंत आनंद झालेला असतो तेव्हां त्यांच्या मुद्रेवर हा भाव येत असला पाहिजे. पण आज त्यांना कसला एवढा आनंद झाला होता बाई ! —स्वारी कांहींतरी लिहण्यांत गुंतली होती ! –कदाचित् त्या इंग्लीश पोरीला एकादें पत्र– ? मला

पाहतांच त्यांनीं त्याच्यावर वेष्टन टाकलें व ते माझ्याशीं गप्पा मारू लागले.

पुरुषाच्या बोलण्यांत कित्येक वेळेला अशी जादू असते कीं दुसऱ्या व्यक्तीच्या मनांत नसलें तरी ते त्याच्यावर पगडा बसवतात! निदान विद्याधरजवळ तरी अशी जादू आहे खास! त्यांच्याशीं बोलतांना अगदीं अल्पावधींत मी माझा संशय विसरून गेलें व अत्यंत उल्हासानें त्यांच्याशीं बोलूं लागलें. त्यांची कॉफीची वेळ झाली तेव्हां मीच त्यांच्याकरता कॉफी तयार केली व त्यांच्यासमोरच्या कोचावर बसून ती त्यांच्या पुढयांत घेतांना मला अमूप आनंद होत होता हें मी ह्या माझ्या खासगी रोजनिशींत कशाला दडवून ठेवूं?

येत्या शनवारीं आम्ही दोघांनीं एक छोटीशी ट्रीप ठरवली आहे! बनशंकरीची!"

माधवीचे डोळे जड होऊं लागले. तिनें रोजनिशी मिटवली. पेन खालीं ठेवलें व हलकेच स्विचकडे हात नेला.

---

# ६ : : बनशंकरी

मनसा चिंतितं कार्य । दैवम् अन्यत्र चिंतयेत् ॥

निदान माधवीची तरी ह्या प्रसंगीं अशी स्थिती झाली. बनशंकरी हें लोण्यावळ्यापासून सहा मैलावरचें एक छोटेसें हिल स्टेशन! तेथील लेण्या आणि पाण्याचे झरे फार पहाण्यासारख्या गोष्टी होत्या व रेल्वेलाईन सोडली तर तासभरच चालावें लागत होतें. विद्याधरनें एका मोटर ट्रॉलीची व्यवस्था केली होती व शनवारची माधवी उत्कंठेनें वाट पहात होती. यशोदाबाईंची कशी परवानगी मिळवावी याचाही ती विचार करत होती;—

पण इतक्यांत तिच्या बंगल्यांत तिनें तारेचा शिपाई शिरतांना पाहिला व त्याच्याकडे पहातांच तिच्या छातींत धस्स झालें. "खरंच! आपल्या दादांची काय वार्ता? त्यांनीं आतां ठरल्याप्रमाणें पाहिलें तर आणखी दोन दिवसांत लोणावळ्यास यावयास पाहिजे!—आणि मग कुठली बनशंकरी!—हो, पण त्यांचें अजिबांत कसें कांहींच पत्र नाहीं! आपण गेले पांच सहा दिवस आपल्या नादांतच गुंतून गेलों!"—माधवीला खरोखर शरम वाटूं लागली.

"बाई सही!"

माधवीनें हातांत लखोटा घेतला असून ती नुसती त्याच्यावरील पत्त्याकडेच कितीतरी वेळ पहात उभी आहे हें

पाहून त्या तारेच्या शिपायानें तिच्यापुढें दोनतीन वेळां कागद फडफडवला.

" अरे हो ! मी हा काय विचार करत बसलें ? "

त्या शिपायानें तिसऱ्यांदा कागद फडफडवतांच माधवी आश्चर्यानें स्वतःशीं म्हणाली व तिनें सही करून त्याचा कागद परत दिला व हलकेच लखोटयाच्या वरची बाजू फाडून तिनें आंत पाहिलें

" Bhayya-saheb sick Wants you here ! "

—Sabnis

भय्यासाहेब आजारी ? माधवीचें तोंड भलतेंच पाहण्याजोगें झालें. तिनें प्रथम टाईम-टेबलाकडें धांव घेतली. सुमारे तासाभरांतच पूनामेल होती. माधवीनें नोकराचाकरांना भंडावून सोडलें व तासाच्या आंत सारी तयारी करून तिनें गाडी गांठली. तेव्हां कोठें तिला हायसें वाटलें. गाडी चालू झाली व बाहेरचा थंड वारा कानाला चांगला झोंबूं लागला तेव्हां कुठें माधवी शुद्धीवर आली. तिनें खिडकी खालीं पाडली व कंपार्टमेंटचें दार पुरतें ओढत आंतील सारे स्विचेस दाबले.

आतां मात्र आंत उबारा पसरला. धडधडत्या चाकांचे आवाज खिडक्यांच्या कांचेवरूनच विरून जाऊं लागले व माधवीचें व त्याच्या बरोबर यशोदाबाईचें मस्तक आतां जरा जरा प्रसन्न होऊं लागलें. यशोदाबाई थोडयाशा सुन्न चेहऱ्यानेंच समोरच्या कोचावर पडल्या होत्या व माधवीनें नांवासाठीं डोळ्यापुढें एक मासिक धरलें होतें, पण तें उलटें होतें का सुलटें होतें याचाच तिला पत्ता नव्हता. गाडी अखाद्या धनुष्यांतील सुटलेल्या तिराप्रमाणें वाऱ्याशीही स्पर्धा करीत वेगानें धावत होती. पलिकडच्या कंपार्टमेंटमध्यें गाडीच्या वेगाला

कुणीतरी अभिसारिकेची कल्पना दिली व ती ऐकून माधवीला हंसू येत होते. तिनें खिडक्यांची लोखंडी अवजारेंही पण पाडली व आंत आतां गाडीचा वेग बिलकूल भासेनासा झाला.

माधवीला वाटलें आपण आपल्या घरांतच आहोंत व त्या शांत वृत्तीनें तिनें समोरच्या नियतकालिकाकडें नीट लक्ष्य टाकायचा प्रयत्न केला.

" तूं तारेंत काय आहे म्हणालीस," यशोदाबाईंनीं तिला विचारलें. " ते फार आजारी आहेत असें नाहीं ना ? "

" नाहीं ग आई ! आणि मला वाटते मी उगीचच फार घाबरलें ! "

आणि माधवीला खरोखरच तसें वाटूं लागलें होतें. तरी पण निघण्यात आपण कांहीं चूक केली असें मानण्यास तिचें मन तयार होईना. कारण तारेंत तसें चक्क म्हटलेलें होतें ना ? –पण भैय्यासाहेबांचा स्वभाव बाई भारीच उतावळा ! जरा कुठें थोडें डोकें जास्त दुखलें असेल तर— ?....

वस्तुस्थिती खरोखरच तशी होती. बंदरच्या पुढचे रूळ खाडखाड वाजवत गाडीनें बोरीबंदरावर प्रवेश केला तेव्हां लांबच्या लांब मान काढून माधवीनें साऱ्या प्लॅटफॉर्मवर दृष्टी टाकली. भैय्यासाहेब तिला दिसले नाहींत. पण सबनीस मात्र एका विजेच्या दिव्याखालीं उभे होते. गाडी थांबतांच ते लगबगीनें लेडीजच्या वरच्या वर्गाकडे आले व यशोदाबाईंना व माधवीला पहातांच ते हंसत हंसत पुढें आले.

" तुम्हाला किती तारा मिळाल्या ? "

" म्हणजे ? " माधवीनें हातांतली ट्रंक हातांतच धरली व ती त्यांच्याकडे पहात म्हणाली.

" म्हणजे आतां काय सांगायचें ? " सबनीस हंसत हंसत म्हणाले. " साहेबांचें दुपारपासून डोकें दुखूं लागलें, संध्याकाळपर्यंतची वेळ झाली तरी तें थांबलें नाहीं ! "

" मग ? "

" मग काय ? त्यांना वाटलें रात्रीं आपल्याला जास्त त्रास होईल व त्यांनीं मला करायला सांगितली तार ! मी तार करून आलों, त्यांना ॲस्पिरीन दिलें, निजवलें ! नंतर एक तासानें उठले ते पुन्हा पहिल्यासारखे ! मला म्हणाले, ' पळ अगोदर, पहिली तार रद्द केल्याचें कळव, त्यांच्या विश्रांतींत व्यत्यय नको !' ' आणि हें पहा,' जातांना ते मला ओरडून म्हणाले, 'आणखी तारेंत असंही लिहा, कीं मीच सकाळच्या पहिल्या गाडीनें लोणावळ्याला येतों !' आणि त्याप्रमाणें त्यांनीं नंतर तयारीही करून ठेवली ! "

माधवीनें आईकडें पाहिलें, व ती हंसली. जणूं काय 'पाह्यलंस ! आई मी काय म्हणत होतें ? ' असाच तिच्या बोलण्याचा अर्थ होता.

" काय सांगू बाईसाहेब, " सबनीस पुढें म्हणत होते " माझी फार इच्छा होती कीं तुम्ही येऊ नयेत म्हणून ! "

" वा ऽ ! खासा न्याय ! " यशोदाबाई त्यांच्याकडे पहात म्हणाल्या.

" तसं नव्हे बाईसाहेब ! पण मालकांकडे पहा, आज दोन वर्षं झालीं पण ते कुठं गेले आहेत कां ? या लढाईचा सुकाळ झाल्यापासून तर कामाचें डोंगर रोज वाढताहेत बघा ! मी साहेबांना पुष्कळ सांगितलें, पण ते कुठचे ऐकतात पहा ! आतांशा तर मला वाटायला लागलें होतें, कीं यांना जबरदस्तीनें उचलून कुठेंतरी विश्रांतीच्या जागीं फेकलं पाहिजे ! अहो रात्रंदिवस काम म्हणजे काय ? त्यांत ही डोकेदुखीची पर्वणी आल्यामुळें बरें झालें होतें पहा ! तुम्ही आज आला नसतात तर साहेबांना उद्या मी नक्की लोणावळ्याला पाठवत होतों पहा ! पण—आतां काय --"

असें म्हणून त्यांनीं अशी कांहीं मुद्रा केली कीं माधवीला भयंकर हंसूच लोटलें.

" अहो, असं काय करताय सबनीस, मी भैय्यासाहेबांना विश्रांति घ्यायला लावते ! सक्तीनें, एक महिनाभर ! "

" तें कुठलें जमायचें ताईसाहेब ! कामाचें सुद्धां एक व्यसन असतं बघा ताई. हीं अशीं माणसं कधीं स्वस्थ बसायचीं नाहींत ! मी चोवीस चोवीस तास कामं करणारीं माणसं पाहिलीं आहेत. काम हेंच त्यांचं जेवण आणि काम हीच त्यांची झोप ! "

" पण आतां मी आहेना सबनीस ! "

" पहा बुवा ! अरे हो, पण आपण कितीवेळ बोलत थांबलों चला ! "

घरीं आल्यावरही भैय्यासाहेबांनीं अशी मुद्रा केली कीं जणूं झाल्या प्रकाराबद्दल त्यांना फार दिलगिरी वाटत आहे.

" काय करूं माई " दिवाणखान्यांत माधवी त्यांच्याजवळ बो घेऊन बसली असतां दिनकरराव तिच्याकडे पहात म्हणाले " दुपारीं एकाएकी भयंकर डोकं दुखू लागलं, आणि मला वाटलं तूं जवळ पाहिजेस. "

" वा ऽ ! " यशोदाबाईंनीं आतां बोलण्याची संधि साधली " माई काय कायमची तुमच्याजवळ रहाणार आहे होय ? "

" हो ! तेंही खरंच म्हणा ! पण तुम्ही कांहींहीं म्हटलं तरी माई आपल्या घरांतून जाण्याची कल्पना आपणांस कशीशीच वाटते बुवा ! "

" तुमचं तरी आपलं कांहींतरीच भैय्यासाहेब, इतकं कां तुम्ही मला घालवायला आतुर झालांत ? "

" छे ग ! माधवी, पण तुझ्या आईचंही म्हणणं खरं आहे ! "

" वा भय्यासाहेब, मला नाहीं असलं कांहीं आवडायचं हं ! "

" वा माधवी ! तुझ्या परीक्षेनंतर तूं कबूल केलेलं आहेस अं ! "

" बरं, जाऊ दे ग, अजून तिच्या परीक्षेच्या निकालाला अवकाश आहे ना ? " भैय्यासाहेब म्हणाले " माई, जरा सारंग वाजवतेस ? "

माधवीनें मान फिरविली व तारांवरून तिनें बो फिरवला. तिच्या वाजवण्यांत संथपणा होता व शांतता होती. भावनांची खळबळ उडवणारें संजीवचें भावगीत ती वाजवत होती व त्या गानाशीं तिच्या वृत्ती पहातां पहातां तन्मय झाल्या.

चल उठ आता सजना पहाट झाली
मधुबोल ऐकूनी तो हंसला सखाही गाली

अरुणास आळविता
लाली उषेस आली
हिरव्या वनांत माझी कपिलाही साद घाली
बहरास येई शेती
कणसांत छान मोती
ही रानपांखरांची बघ टोळधाड आली
मी घागरी भरावी
तूं मोट चालवावी
राणी तुझ्या जिवाची प्रिती रसांत न्हावी !

शेवटच्या ओळी वाजवतांना माधवीला एकदम विद्याधरची आठवण झाली व ती थोडीशी थरारल्याप्रमाणें झाली. भैय्यासाहेबांची तार आल्याबरोबर ती झपाट्यानें लोणावळा सोडून निघाली होती व आपल्या घरीं येऊन दिनकररावांना व्यवस्थित पाहीपर्यंत तिचा जीव जाग्यावर नव्हता; पण आतां सारें ठीक पाहून ह्या भावगीताच्या शेवटच्या ओळी वाजवतांना विद्याधर आतां तिच्या नजरेसमोर उभा राहिला. ती निघून आली होती. पण निघतांना तिला कशाचीच आठवण राहिली नव्हती. विद्याधर जणूं तिच्या गांवींच नव्हता व कोणत्याही तऱ्हेनें चौकशी करण्याचें वा त्याला कांहीं निरोप ठेवण्याचेंही तिच्या ध्यानांत आलें नव्हतें.

आणि ह्या साऱ्या गोष्टी ध्यानांत येतांच ती दचकल्याप्रमाणें झाली. तिनें विद्याधरबरोबर केवढया उत्साहानें बनशंकरीच्या सफरीची चर्चा केली होती व त्याच्या तयारीलाही ती लागली होती. पण दिनकररावांची तार येतांच तें सारे विसरून ती एखाद्या यंत्राप्रमाणें

निघून आली होती ! आपण हें किती उत्कट भावनेच्या भरांत केलें हें आतां तिला पटलें व ताबडतोब तिनें निश्चय केला कीं आतां पहिलें काम विद्याधराला साऱ्या गोष्टींचा खुलासा करणारें पत्र प्रथम लिहायचें आणि त्यांत खूप खूप मोठी दिलगिरी प्रदर्शित करायची.

माधवी विचारांत गुंतली होती, व दिनकरराव इकडे तिला सारखे हाका मारीत होते. दोन हाका मारून ती 'ओ' देत नाहीं असें पाहून त्यांनीं थोडें मोठयानें म्हटलें

"तूं कसल्या विचारांत गुंतली आहेस मधु !"

"अं ऽ !" माधवी आतां शुद्धीवर आली व त्वरेनें भैय्यासाहेबांना उत्तर देत म्हणाली "काय म्हणता दादा !"

"मी तुला हें पुस्तक दाखवत होतों, 'निसर्ग आणि सौंदर्य' या विषयावर हें कोणी एका नवीन लेखकानें लिहलेलें आहे, फार छान पुस्तक आहे !'

"तुमचं आहे ना दादा !'

"नाहीं ग ! हें 'मेट्रो पब्लिशींग ब्यूरो' चं आहे. मला हें मिळालं असतं तर फारच बहार झाली असती !'

"म्हणजे ? इतकें चांगलें आहे कां तें ?" माधवीला आपल्या वडीलांची पुस्तक-चिकित्सा माहिती होती व म्हणून तिनें विचारलें.

'होय, गेल्या कित्येक दिवसांत मी असं पुस्तक वाचलं नव्हतं!"

"अस्सं ! मग ठेवा त्या मेजावर, मधून मधून मीही वाचत जाईन !"

असें म्हणून ती उठली व पाकगृहांत आपली आई काय करते आहे हें पाहण्यासाठीं निघून गेली.

---

## ७ : . : पूणें

त्यानंतरचे मुंबईंतले दिवस माधवीला फारच कंटाळवाणें गेले. एक तर गेले कित्येक दिवसांत ती मुंबईच्या बाहेर गेली नव्हती, व दुसरें म्हणजे तिला आतां आर्टस्कूल नव्हतें. कॅनव्हास काढून बोर्ड रंगवण्याला ती कंटाळली होती व रेक्लमेशन आणि हँगिग गार्डन या गोष्टींत आतां तिचें मन रमेनासें झालें. लोणावळ्याचा हवापालट तिला फारच चांगला वाटला होता, पण तो असाच अर्धवट सोडून ती निघून आली होती. तिनें विद्याधरला पत्र पाठवलें होतें, पण आज आठ दिवस होऊन गेले तरी त्याच्या उत्तराला पत्ता नव्हता. माधवीला मोठें आश्चर्य वाटत होतें. विद्याधर अशी दिरंगाई व हेळसांड करणारा मनुष्य नव्हता. पण कोणत्या कारणानें त्याच्या पत्राला उशिर लागावा हेंच तिला उमगत नव्हतें. आपण एकाकी आणि न सांगता निघून आल्याबद्दल व बनशंकरीची सफर टाळल्याबद्दल तर त्याला राग आला नसेल असें एक वेळ तिला वाटलें, पण दुसऱ्याच क्षणीं त्या कल्पनेचें तिला इतकें हंसू आलें कीं तिनें ती मनांतून पार काढून टाकली.

आठ दिवसांनीं तिला एक पत्र आलें, पण तें अमदाबादचें होतें. कुंदा कर्णिकचें—तिच्या मैत्रिणीचें लग्न होतें व तिनें तिला आग्रहानें येण्याची विनंति केली होती. माधवीनें विचार केला व तिला ती.

कल्पना ठीक वाटली. पण यशोदाबाईंजवळ ती तें बोलली मात्र, त्यांनीं एकदम तिला उत्तर दिलें

" मी नाहीं तुला परमुलुखांत एकटी पाठवायची ! "

माधवीला भयंकर हंसू आलें " म्हणजे तूं काय मला अजून कुकुलं बाळ समजतेस ? "

" तसं नव्हें, तुला आपलं जायचं असलं तर तूं पुण्याला जा ! तुझी मावशी तुला किती दिवस बोलावतेच आहे ! "

माधवीला ही कल्पनाही फार हृद्य वाटली. पुण्याला तर ती गेल्या सात आठ वर्षांत गेली नव्हती. व लहानपणच्या तिच्या पुण्याच्या सफरी व त्यावेळीं द्वारकाबाईनें व सदाशिवरावानें तिचें केलेलें कौतुक, व पुण्याचे ते लहानलहान रस्ते, पर्वती व ती बाग —! माधवीनें एकदम संमति दिली व इतकेंच नव्हे तर दोन दिवसांत ती पुण्याला येऊन दाखल झाली सुद्धां ! टांग्याचा आवाज ऐकून द्वारकाबाई पोळीचा तुकडा घेऊन बाहेर आल्या व तिच्यावरून तो ओवाळून टाकत असतां त्या तिच्याकडे पाहून म्हणाल्या

" मधु, बरीच मोठी झालीस कीं ग ! मागं आलीस त्यावेळला परकरांत होतीस ! आणि काय ग, इतक्या दिवसांत आज मावशीची आठवण झाली वाटतं ? "

" मावशी ! " ती तिला नमस्कार करीत म्हणाली " मी आत्ता कुठें येते आहे ! मला जरा बसू दे ! आणि मग एकेक प्रश्न विचार !"

" अग वा ! " मावशी अभिमानानें तिच्याकडे पहात म्हणाली " चुरचुरीतपणा आहे तसाच कायम आहे कीं ग ! "

माधवीचे पहिले दोन दिवस तर फार सुखांत गेले. द्वारकाबाई आणि सदाशिवराव म्हणजे एक आदर्श दांपत्याचा नमुना होता. मावशी तर रूपानें आणि गुणानें यशोदाबाई पेक्षाही फार वरचढ होत्या, पण त्यांचा मुख्य लक्ष्यांत घेण्याजोगा गुण म्हणजे प्रेमळपणा ! त्या आज चाळिशीला येऊन पोचल्या होत्या, पण त्यांच्याकडें पाहिलें तर त्या पहिल्या पंचविशींतल्याप्रमाणें अद्याप वाटत होत्या. त्यांचें आरोग्य विलक्षण होतें व श्री आणि सरस्वती या दोहोंचाही मिलाप त्यांच्या ठिकाणीं उत्तम झालेला होता. सदाशिवराव युनायटेड कमर्शियल सिंडीकेटचे मॅनेजर होते व आपल्या अंगच्या गुणांनीं त्यांनीं या जागेपर्यंत आघाडी मारली होती. गेलीं वीस वर्षें ते याच जागेंत रहात होते व या लढाईच्या सुरवातीलाच सदाशिवरावांनीं तो बंगला आपल्या मालकीचा करून टाकला होता. द्वारकाबाईंना हें सांगतांना किती अभिमान वाटत होता व तो रास्तही होता. खुद्द माधवीलाही ती जागा फार आवडली होती. चारी बाजूंनीं फुलझाडांचे ताटवे फुललेले होते व मागच्या बाजूस एक प्रशस्त विहीर !

मुंबईच्या कोंदट हवेंतून माधवीला अगदी सुटल्या सुटल्याप्रमाणें वाटत होते व ती मुक्तपणानें स्वैर भराऱ्या मारत होती. मावशीच्या शेजारींच दुसरा एक टूमदार बंगला होता व त्या बंगल्यांतील नंदिनी नांवाची अेक गोड पोरगी मावशीच्या घरीं सारखी येत होती. चार वर्षांची ती गोड पोरगी ! माधवीला मुलांचें भारी वेड व तिला पहातांच तिचें सारें अपत्यप्रेम एकदम उचंबळून आलें व तिनें एकदम तिला पोटाशी धरलें. नंदिनीची आणि तिची फारच गाढ मैत्री जमली होती व त्या

दिवशीं ती आली व माधवीच्या गळ्यांत हात टाकून मोठ्या अधिकारानें म्हणाली

" आज मात्र तुम्हांला आमच्या घरीं यायला पाहिजे हं ! "

" कां ग ? "

" उद्या दादा घरीं येणार आहे, आणि तो आला म्हणजे तुमाला त्याची खोली पहायला मिळणार नाहीं ! "

" अस्सं ऽ ! "

" काय ग नंदु ! " तितक्यांत मावशीनें येऊन तिला विचारलें.

" तुझा दादा उद्या येणार आहे होय ग ? "

" हो ! " ह्या गोड पोरीनें हंसत हंसत उत्तर दिलें " आई कलंज्या कलते आहे, अन् तिनें तुमाला अन् ताईला बोलावलंय ! "

" असं कां ? बरं, येऊ हं ! "

दुपारीं माधवी मावशी बरोबर त्यांच्याकडे गेली तेव्हां थोड्या संभाषणाच्या अवधींत तिला कळून आलें कीं नंदिनीची आई ही एक खरोखरच फार मनमिळाऊ बाई आहे. द्वारकाबाई आणि माधवी गेल्या त्यावेळीं नंदिनीनें सांगितल्याप्रमाणें खरोखरंच त्या फराळाचे तळत होत्या व द्वारका काकूंना पहात त्या म्हणाल्या.

" या ! याच कां तुमच्या पाव्हण्या, कीं ज्यांच्यामुळें तुम्हाला दोन दिवस आमच्याकडे यायला सवड झाली नाहीं ! "

" होय, हीच ती आमची मधू ! यंदा आर्ट मास्टरच्या परीक्षेला बसली आहे ! "

" हो कां छान !"

नंदिनीच्या आई मान वेळावत म्हणाल्या. माधवीला त्यांच्या आविर्भावाची मोठी गंमत वाटली व ती किंचित् सूक्ष्मपणें हंसली. नंदिनीची आई प्रमिलाताई या फार सुस्वरूप आणि नीटस् होत्या. नंदिनीच्या त्या आई असाव्यांत हे त्यांच्याकडे पाहून पटकन् पटत असें. त्यांचें भाषण लाघवी व गोड होतें व बोलतांना त्या किंचित् हंसत त्यावेळीं त्यांच्या गालावरची खळी स्पष्टपणें चमके व त्यामुळें त्यांच्या चेहऱ्यावर आणखी तजेला चढल्याप्रमाणें वाटे. घरांतली स्वच्छता व टापटीप व प्रमाणबद्ध रचना ही त्यांच्या कलाचातुरीचे गुण दाखवीत होती व नंदिनीची वागणूक ही त्यांची शिस्त दाखवित होती. कांहीं माणसें अशीं असतात कीं आपला त्यांच्याबद्दल एकदम चांगला किंवा वाईट ग्रह होतो. माधवीचा प्रमिलाताईबद्दल चांगला ग्रह झाला होता.

" विद्याधर कुठें झांशीला गेलाय् ? " बोलतां बोलता द्वारकाबाईंनीं विचारलें.

" हो ! उद्या--परवापर्यंत येईल तो. त्याच्या वाढदिवस आहे या पौर्णिमेला !"

" अस्सं ! तरीच ही तयारी चाललीय्. "

विद्याधर हें नांव ऐकतांच माधवी चपापली. तिनें प्रमिलाताईंच्या चेहऱ्याकडे नीट निरखून पाहिलें व आपल्या मावशीकडें पाहिलें. तिला एकवेळ वाटलें कांहीं विचारावें, व म्हणून ती ओठ उघडणार, पण तिथें तिचा स्त्रीसुलभ संकोच आडवा आला व ती आपोआप गप बसली. तिनें मावशी आणखी कांहीं बोलते कां म्हणून तिच्याकडे

पाहिलें. पण तिनेंहि तिची निराशा केली. तिनें दुसराच विषय काढला

" पुण्याची बस कंपनी म्हणे म्युनसिपालिटी ताब्यांत घेणार आहे ? "

माधवीनें मनांतल्या मनांत त्या बसकंपनीला आणि म्युनिसीपालिटीला एक लाख नांवं ठेवलीं असतील, व ती विद्याधरशी झालेल्या आपल्या भाषणांचा सारांश आठवूं लागली. विद्याधरनें तिची सारी माहिती विचारून घेतली, पण आपण मात्र विद्याधरला कांहीं विचारल्याचें किंवा त्यानेंही आपण होऊन कांहीं सांगितल्याचें आठवत नव्हतें, आणि त्यांत पुण्याबद्दल तर तो कांहींच बोलल्याचें तिला स्मरत नव्हतें.

—पण नंदिनीनें तिची त्या विचारांतून सुटका केली. तिनें मागून येऊन हळकेच तिच्या गळ्याभोंवतीं हात घातला व तिच्या पुढयांत एक पुस्तक धरीत लडिवाळपणें ती म्हणाली

" माई ! हें काय आहे, माहित आहे ? "

" काय ?" माधवीनें त्या उलटया धरलेल्या पुस्तकाकडें पहात विचारलें.

" अग असं काय करतेस ! त्यांना नीट दाखव ना, तुझ्या दादाचा पराक्रम दाखवावयचा असेल तर ? " असें म्हणून प्रमिलाताई हंसल्या व तिच्याकडे पहात म्हणाल्या " विद्याधरनं लिहलंय तें पुस्तक ! आणि ह्या छोटाबाईला अर्पण केलंय ! त्यामुळें तिला कोण अभिमान वाटत असतो दादाचा. आल्यागेल्याला दाखवत असते !"

" हो का ?"

असें म्हणून माधवीनें पान उघडलें, व तसें करतांना मुखपृष्टाकडें तिची नजर गेली.—आणि तसें होतांच ती एकदम दचकली The Nature & The Beauty !

म्हणजे लोणावळ्यांतून ती मुंबईला परत आली असतां भैय्यासाहेबांनीं ज्या पुस्तकाची तिला शिफारस केली होती तेंच तें पुस्तक होतें ! ' निसर्ग आणि सौंदर्य ! ' भय्यासाहेबांच्या शिफारशीवरून तिनें तें वाचून काढलें होतें, नी त्यानंतरच्या आठ दिवसांच्या मुक्कामांत तिनें तें आणखी दोन वेळां वाचून काढलें होतें; व अखेर ती भय्यासाहेबांना म्हणाली होती ' दादा, खरंच हें पुस्तक तुम्ही दुसऱ्या आवृत्तीसाठीं तरी मिळवा ! ' त्यावर भैय्यासाहेब हंसले होते व तो विषय तितकाच सुटला होता.

पण आज तें पुस्तक इथें बघतांच तिला त्या साऱ्या गोष्टीची आठवण झाली व तिनें कौतुकास्पद दृष्टीनें नंदिनीकडें पाहिलें. पहिलीं दोन पानें उलटतांच मध्यंतरी बारक्या व सोनेरी अक्षरांत छापलें होतें

To
My young sister
NANDINI

माधवीला त्या अर्पण पत्रिकेचें त्यावेळीं कांहीं वाटलें नव्हतें, पण आतां तिला त्याचें कौतुक वाटलें. नंदिनीही अभिमानानें तिच्याकडें पहात होती व आपल्या दादाबद्दलच्या तिच्या डोळ्यांतल्या भावना पाहून माधवीनें तिला हलकेंच जवळ घेतलें. मुखपृष्टावर एक तिरंगी आकर्षक चित्र होतें व त्याच्या खालीं कोरलेलें होतें:—by V.R.Patan-

kar. व्ही. आर. या शब्दाचें तिला त्यावेळीं महत्व वाटलें नव्हतें, पण आतां ह्या योगानें आपली ह्या लेखकाची ओळख होण्याची संधि आली याचा तिला आनंद वाटला.

" मी वाचलें आहे हें पुस्तक ! " त्याचीं पानं चाळीत अर्धवट तिरक्या नजरेनें प्रमिलाताईकडें पहात माधवी म्हणाली, " पण बाजा-रांत हें पुस्तक मिळत नाहीं आतां ! "

" हो ! विद्याधर म्हणत होता कीं त्याला प्रकाशकाचं पत्र आलंय कीं दुसरी आवृत्ती काढावी म्हणून ! "

माधवी थोडया अनिमिष नेत्रांनीं प्रमिलाताईकडे पहात राहिली, पण लगेंच तिच्या मनांत कल्पना आली व नंदिनीला उद्देशून म्हणाली

" अग चल, तूं मला तुमचं घर दाखवणार आहेस ना ? "

" हो ! चला ना ! "

नंदिनी नाचत नाचत निघाली व चारदोन पावलें पुढें जाऊन ती पहिल्या खोलीवरच वळली व त्याचा पितळी दांडा फर्रकन् ओढत म्हणाली ' ही आमच्या दादाची खोली ! "

माधवीनें आंत पाऊल टाकलें व खोलीच्या मध्यभागचा एक ग्रुप साईज फोटो पाहून तिची खात्री झाली, कीं ' हेच ते विद्याधर ! '

तिचें हृदय अतीव आनंदानें भरून आलें. त्यांत हर्षाला जागा नव्हती व नंदिनीला हलकेच उचलून तिच्या गालाचे पापे घेत ती थोडयाशा गुदमरलेल्या स्वरांतच उद्गारली—

" नंदू, हेच तुझे दादा अं ऽ ! "

## ८ : : व्हर्साव

“ नंदू तुला चांदण्यांत फिरणं आवडतं का ? ”

“ अं ! एकटी नाहीं, तुझ्या आणि दादाच्याबरोबर ! ”

नंदिनी माधवीचा हात धरून चालत होती. तिच्या बारक्या बुटांचा त्या डामरी सडकेवर टाप् टिप् आवाज होत होता व त्याच्या तालाबरोबरच माधवीच्या आणि विद्याधरच्या शूज्चे आवाज ताल धरत होते. लष्करांतली ती हद्द. काळ्याभोर डामरी सडकेवर चंद्राचीं सुशांत किरणें मोठया डौलानें चमकत होतीं व त्यांत नंदूचा हात धरून विद्याधरच्या बरोबर चालण्यांत माधवीला अपरिमित सुख होत होत होतें.

व्हर्साव सिनेमागृहाच्या बाहेर· ती नुकतीच पडली होती व त्या सिनेमा कथानकाच्या उदात्ततेचा परिणाम दोघांच्याही मनावर फार झालेला होता. सिनेमाचें कथानक थोडक्यांत असें होतें, कीं मेलार्ड नांवाचा तरुण ईव्हॉन आणि ब्यूटी ह्या दोन तरुणींच्या प्रेमपाशांत लुब्ध झालेला असतो. पैकीं ईव्हॉन ही त्याच्यावर निस्सीम प्रेम करणारी असते व ब्यूटी ही त्याच्या सौंदर्यावर व संपत्तीवर प्रेम करत असते. ईव्हॉन त्याच्यासाठीं निरनिराळीं धाडसें करते व कांहीं आडमार्गांतून त्याला वांचवून त्याच्यापुढें ब्यूटी उभी करते व स्वतः ‘ नॅशनल नर्सरी डिव्हीजन ’ मध्यें जॉईन होते. सौंदर्यामुळें मेलॉर्डचेंही

प्रेम ब्यूटीवरच असते. पण नंतर ईव्हॉनच्या एकेक कृति पाहून त्याच्या मनांत प्रकाश पडतो व ईव्हॉन त्याचा निरोप घ्यायला येते तेव्हां विव्हल होऊन तिच्या हातावर तळवा टेकवून तो म्हणतो

" ईव्हॉन तूं जाणार ? खरं प्रेम अशी ताटातूट सहन करत नाहीं ! "

" माझं तुझ्यावर शाश्वत प्रेम आहे मेलॉर्ड ! मी तुझ्या आत्म्यावर आणि गुणावर प्रेम करते. माझे भाव इतके उच्च आहेत कीं त्यांत तुझें माझें शारीरिक मीलनच झालें पाहिंजे असें नाहीं ! तूं दुसऱ्या कुणाशीही विवाहित झालांस तरी माझें प्रेम सदैव तुजवर राहील व मला कुणाचा मत्सर वाटणार नाहीं ! मेलॉर्ड, जातें मी !–

आणि चित्रपट तिथेंच संपला होता ! चित्रपटांतील प्रमुख भूमिका फारच समजून करण्यांत आल्या होत्या व त्यामुळें चित्र फारच हृदयस्पर्शी वठलें होतें. विशेषतः शेवटचा देखावा पहातांना माधवीच्या डोक्यांत अश्रू आले व शेजारच्या विद्याधरकडें पहात ती स्वतःशी म्हणाली

" विद्याधर, माझ्यावर हा प्रसंग आणू नका !"

विद्याधर येऊन आज सहा दिवस झाले होते व त्या अवधींत तो तिच्याशी इतक्या मोकळेपणानें व स्वछंदानें वागला होता कीं माधवीला आपल्या पुण्याच्या आगमनाचें सार्थक झालें असें वाटत होतें. त्याचा ऐटदार उंचनीच बांधा, व व्यवस्थितपणानें त्यानें चढवलेले कपडे,–तो रुबाबांत चालू लागला म्हणजे माधवी त्याच्या-कडे पहात राहीं व मनांत म्हणे

" ह्याची साथ करायला मला मिळेल कां ? "

विद्याधर माधवीपेक्षांही थोडासा अधिकच गौर होता व तो मुक्तभरानें हंसू लागला कीं माधवीला त्याच्या भालप्रदेशाकडे पहात रहावेंसें वाटे. त्याचा स्वभाव फार विनोदी होता व लोणावळ्यापेक्षांही पुण्यास माधवीला पहातांच त्याला जें आश्चर्य वाटलें पण त्याबरोबर जो आनंदही वाटला तो कांहीं त्याला लपवता आला नाहीं व माधवी-लाही अर्थात् तें पाहून फार सुख झालें होतें.

" हं ! आतां कसं पकडलें एका माणसाला ! " तो हंसत हंसत म्हणाला होता "आम्हाला न सांगता पळून जायला पाहिजे नाहीं कां ?"

" इश्श्य् " माधवी त्यावर थोडीशी लाजली, पण लगेच ती उलटया धिटाईनें म्हणाली " पण एका माणसाला साध्या पत्राची सुद्धां उत्तर देण्याइतका वेळ नसतो ! "

" कुणाला ? मला कीं तुला—

विद्याधर चटकन् बोलून गेला पण नंतर त्यानें स्वतःची जीभ चावली व चोरून माधवीकडे पाहिलें. पण तिथें त्यानें जे भाव पाहिले त्यामुळें त्याला उलट धीरच आला, व ' आपलें कांहीं चुकलें नाहीं, असें समजून तो निर्धास्तपणें पुढें बोलूं लागला.

" म्हणजे ? तुम्हीं मला पत्र पाठवलें होतें ? " माधवीनं विचारलें.

"हो ! लोण्यावळ्याहून तुम्ही एकाएकी निघून गेलांत, पण मला तुमच्या माळ्यानें कारण सांगितलें, त्यानंतर मीं तुला पत्र पाठवणार होतों, पण मला एकाएकी झांशीला जावें लागलें. झांशीहून सवड

काढून मी एक दिवस दिल्ली आणि आग्रा केली, आणि आग्रयाहून मी तुला पत्र पाठवलें होतें !"

"शाबास !" माधवी हंसत हंसत म्हणाली म्हणजे दोघांनींही एकमेकाला पत्र पाठवून दोघेही वाट पहात राहिलों !"

"ताजमहाल मी पाहिला मधु."

मधु !–मधु हें माधवीचें आवडतें नांव होतें व भैय्यासाहेबच फक्त केव्हां केव्हां बोलण्यांच्या भरांत आले म्हणजे तें नांव उच्चारीत असत ! एरवी कुणाच्या लक्ष्यांत ही कल्पना येत नसे पण तें नांव उच्चारतांच माधवीला फार आनंद होई. विद्याधरनें तें नांव उच्चारतांच माधवीला आनंद झाला, व ती अवधानतेनें विद्याधरकडे पाहूं लागली. विद्याधरचें पण तिच्या चेहऱ्याकडे लक्ष्य नव्हतें व तो आपल्या नादांत बोलत होता.

"चांदण्यांत मी आणि माझे मित्र तो पहायला गेलों होतों. चंद्र उगवला—आकाशांत एकच चांदवा उगवला, पण ताजमहालावर सहस्त्र चंद्र उगवले मधु ! सहस्त्रधारांनीं त्याचे किरण ताजमधून परावर्तूं लागले व यमुनेच्या पाण्याचा नुसता दूध-सागर होऊन गेला. मी पहात होतों, माझें मन विटत नव्हतें ! पण त्यावेळेला मला कुणाची आठवण झाली असेल तर तुझी !"

"इश्श्य् ऽ !" माधवीच्या चेहऱ्यावर सुखद हर्षलहरी उचंबळल्या व त्या वेगानें लपवीत ती मान खालीं घालून उद्गारली.

"कॉफी घ्यायचीय नंदु !"

बोलता बोलता ते रिगल समोर आले होते व तिथला चकच-काट पाहून विद्याधरनें नंदिनीला विचारलें. नंदिनीला आज कोणतेंच विचार नव्हते. दादा आणि माधवी यांच्याबरोबर खूप हिंडायला मिळालें याचाच तिला आनंद होत होता व त्यांच्याकडें लक्ष्य देत ती माधवीचा हात धरून मुकाटयानें चालली होती. विद्याधरनें मधेंच तो प्रश्न विचारलेला पाहून ती थोडीशी बावरल्याप्रमाणें झाली व माध-वीच्या चेहऱ्याकडे पाहू लागली.

" तिला काय विचारतांय ? " माधवी हंसत म्हणाली "तुम्हाला पाहिजे असेल तर चला ना !"

" तुला पाहिजे आहे कां ? "

" हो ! "

पुरुषाइतक्या उंचीच्या त्या रेस्टॉरांच्या पायऱ्या चढून जातांना तिला फार सुख वाटत होतें. तिच्या भावना उत्कटतेनें बहरल्या होत्या व तिच्या हालचालींत एक प्रकारचा अनुद्भुत स्वैरपणा आला होता. आंत जाऊन ती एका कोपऱ्यापाशी बसली व त्या चकचकाटांत भोवतालच्या सर्व आरशांत तिचें आणि विद्याधरचें शेजारी शेजारी उमटलेलें प्रतिबिंब पाहण्यांत तिला फार मौज वाटत होती. विद्याधर तिच्या शेजारीच बसला होता व त्याचें प्रतिबिंब किती उठावदार दिसत होतें. आणि ती विद्याधरशेजारी होती म्हणूनच इतकी उठून दिसत होती. निदान तिला तरी तसें वाटलें.

विद्याधर तिच्याशी फार मोकळेपणानें व प्रणयोद्भुत अशा भाव-नेनें वागत होता. त्याच्या सहवासांतले क्षण तिला मोहक वाटत, पण

मधेंच तिच्या डोळ्यासमोर डोरोथी येई ! ती प्रमत्त आणि गौर आंग्ल तरूणी ! दोन वेळां लोणावळ्याला विद्याधराच्या कॉटेजमधें वावरतांना तिला माधवीनें पाहिलें होतें व तिची व विद्याधरची ओळख नव्हती तेव्हां त्यांच्या मेळाव्यांत स्वछंदानें हंसतां खिदळतांनाही तिनें त्याला पाहिलें होतें. किंबहुना डोरोथीबरोबरही तो इतक्याच मोकळेपणानें हंसत खेळत असेल असें तिला वाटे—कां त्याचा स्वभावच मुळीं असा आहे ?

माधवीला मधून मधून अशा शंका येत व ती बेचैन होई.

---

# १ : : मुंबईहून परत

वृत्तपत्रांतलीं लढाईचीं वर्णनें जास्त भडक भडक येत होतीं. जर्मनीच्या विरुद्ध दोस्त राष्ट्रांची सारी अभेद्य सेना एकवटून उभी होती तरी जर्मनी त्यांना हैराण करून सोडत होता. आठ कोटी लोकांचा एक देश पण जबरदस्त लष्करी अंमलाखालीं व राष्ट्रभावनेच्या एकीखालीं त्यानें सर्व जगांत धुमाकूळ माजवला होता.

माधवी चेस्ट ऑफ ड्रॉवर्ससमोर बसली होती. तिच्या समोर आरशाचा भव्य बिलोर तळपत होता व त्यांत दोन्ही बाजूंना केशालाप सोडून मोकळी बसलेली तिची मूर्ति तिला फार मनोवेधक वाटत होती. आज ती फार खुशींत होती. मधून मधून ती गाण्याचा एकादा दुसरा चरण गुणगुणे व थोडीशी शीळही तिच्या तोंडांतून जाई.

—पण तितक्यांत घाईघाईनें नंदिनी तिला आपल्या पायऱ्या चढून येताना दिसली. इतक्या लवकर तिनें आपल्याकडें यावें याचें तिला थोडेंसें आश्चर्यच वाटलें. तिच्या चेहऱ्यावर थोडी खिन्नता आणि विषण्णताहि दिसत होती.

"काय ग नंदू !"

पण ती कांहीं एक न बोलतां तिच्या पातळाला बिलगली व तिचे ओचे धरून ती कांहींशा दुखऱ्या स्वरांत म्हणाली

"अं ऽ !—नाहीं जा !"

माधवीला तिच्या या कृतीचें थोडें आश्चर्यच वाटलें व तिच्या केशालापावरून हात फिरवीत तिनें विचारलें

" नंदाबाई !"

" बघ ग माई ! " फुगवलेले गाल थोडेसें सोडत नंदिनी उत्तरली " दादा कसा एकदम मुंबईला गेला, मला न सांगतांना ! मी आतां त्याच्याशी बिलकुल बोलणार नाहीं ! मला आतां आज तुझ्याकडेच न्हायला घाल, मी इथेंच जेवीन आणि इथंच झोपीन !"

नंदू खूप बोलत होती, पण माधवीचें तिच्याकडें लक्ष्य होतें कुठें ? विद्याधर मुंबईला गेला एवढें तिनें ऐकलें व तिच्यापुढें एकदम एक मोठें प्रश्नचिन्ह उभें राहिलें ! विद्याधर असा एकाएकी कां गेला, आणि विशेषत: म्हणजे आपल्याला न सांगता कां गेला ? तिला कांहींच समजेना व कांहींच कळेना. काल सायंकाळीं ती विद्याधर-बरोबर फिरावयास गेली होती महाराष्ट्र कॉलेजच्या वळणावर—! विद्याधर आज खूपच मनमोकळेपणानें तिच्याशी बोलत होता व आपल्या आयुष्यांतल्या गत हकीकतीही तो बऱ्याच उत्साहानें तिला सांगत होता. माधवीला फार आनंद वाटत होता व ती सौख्यसामरांत पोहत होती.

अंधार पडला तशीं तीं तिघेंही उठलीं व लकीजवळ येतांच आज माधवी म्हणाली

" आज मला कॉफी हवी आहे !"

विद्याधरला तें ऐकून बरें वाटलें व तो पारिपार्श्वकाच्या वाटेनें आंत शिरला. चांदणें थोडेंथोडें पसरूं लागलें होतें व ते एका

फॅमिली ग्रुपमध्यें जाऊन बसले. माधवीला आजची कॉफी फार स्वादिष्ट लागत होती व त्याचे घोट घेता घेता ती आरशांच्या कोनांतून विद्याधरकडे न्याहाळून पहात होती व मधून मधून तिथल्या शो–केसेसवर दृष्ट टाकत होती. तिथें लहान मोठया कपबशा व टेबल–पॉटस् ठेवले होते. माधवीला त्यांतला एक फ्लॉवर पॉट फार आवडला. त्यावर अेका अर्धनग्न नर्तकीचें चित्र होतें व ती घटांत पाणी ओतण्यासाठीं उभी आहे असें भावदर्शन तिच्या चेहऱ्यावर केलें होतें. तें फार उत्कृष्ट साधलें होतें.

" हा पॉट पाहिजे मला ! " मधु थोडया धिटाईनें म्हणाली.

" असं ! " विद्याधरच्या चेहऱ्यावर हास्याचा गालिचा पसरला. त्यानें पुढें होऊन त्याची किंमत पाहिली. नंतर आपलें पाकिट तपासलें व नंतर आंत आलेल्या ' बॉय ' ला त्यानें तो पॉट काढून देण्यास सांगितलें.

काऊंटरवर विद्याधर पैसे मोजत होता. त्याच्यापासून थोडया अंतरावर माधवी नंदिनीचा हात व एका हातांत फ्लॉवर पॉट धरून उभी होती, इतक्यांत समोरून येणाऱ्या एका व्यक्तीनें तिला हटकलें.

" बरीच आहेस कीं ग ! " उषा तिचे खवाटे धरून म्हणत होती.

" इतकी गुंग होऊन जातेंस काय ? "

" म्हणजे काय ? " माधवीनें डोळे विस्फारून तिला विचारलें

" म्हणजे तेंच ! हे बघ ! घाबरूं नकोस, मी त्याच आघाडीवर आहे !"

असें म्हणून तिनें आपल्या गळ्यांतल्या मंगळसूत्राचें पदक तिच्यापुढें धरलें व मागें एक कटाक्ष टाकून थोडया अंतरावर सिगरेट-कॅनस खरेदी करत असलेल्या एका तरुणाकडे बोट दाखवून ती म्हणाली

" याचे धनी !"

" बाई ! कमाल आहे तुझी ! " माधवी आश्चर्यानें तिच्या धाष्टर्याकडे पहात म्हणाली " आणि, क्लासमधलीं तुझीं मतं ग !"—

" यांच्या तडाख्यांत सांपडल्यावर पार विरघळलीं ! स्वारी टेनिस चांगले खेळते अं ! इथें माझ्या मामाकडे त्यांची माझी ओळख झाली, आणि निकालाचीही वाट न पहातां आम्ही उरकून घेतलें ! बाकी, तूंही बरीच आहेस कीं ग—"

पण इतक्या वेळांत विद्याधर पैसे पावते करून व त्या इराण्यानें दिलेली मोड परत व्यवस्थित ठेवून परत आला होता, व इकडे उषेचेही यजमान हळू हळू त्यांच्याजवळ येऊन दाखल झाले.

" ही माझी मैत्रीण, " माधवी विद्याधरला ओळख करून देऊं लागली.

" उषा........"

" मराठे, आणि हे मिस्टर अरविंद मराठे, कॅशिअर रिझर्व बँक ! आणि ही माझी मैत्रीण माधवी—"

" जोशी ! "

" आणि हे मिस्टर—"

" विद्याधर पाटणकर ! "

आणि तें ऐकतांच उषानें जो मोठा विचित्र चेहरा केला होता तो आठवून जातां जातां माधवीला अद्याप हंसू येत होतें. विद्याधरही मनसोक्त हंसला होता, पण तो अखेरीस म्हणाला होता.

" पण त्यांत त्या बिचारीचा काय दोष म्हणा ! आणि ती जें कांहीं समजली असेल त्यांत गैर तरी काय म्हणा ! "

यावर माधवीनें दचकून त्याच्याकडें पाहिलें होतें. म्हणजे ? विद्याधरच्याही मनांत तीच कल्पना आहे तर ! तिनें त्याच्याकडें पाहिलें पण तो पुढें कांहीं बोलला नाहीं.

आणि तें वाक्य माधवीच्या मनांत अद्यापपर्यंत घोळत होतें. त्याच्या आशावादी बोलण्यानें तिच्या वृत्ती फार उल्हसित झाल्या होत्या, व अशा परिस्थितींत नंदिनीनें हलकेंच तिच्या पुढयांत येऊन सांगावें कीं, विद्याधर मुंबईला गेला म्हणजे काय ? ' तिला अर्थच कळेना या घटनेचा !

ती विद्याधरच्या घरीं गेली, पण प्रमिलाताईंना सुद्धां विद्याधरच्या अचानक जाण्याचें कांहीं समर्थन करतां आलें नाहीं. तिला एवढेंच कळलें कीं विद्याधरला उजाडता उजाडता एक तार आली व ती पाहतांक्षणींच तो गडबडीनें निघून गेला.

" केव्हां परत येतो म्हणाले ? "

" काय कीं बाई ! पण एक दोन दिवसांत येईल म्हणाला ! "

"आणि—"

पण तिला संकोच वाटला व तिनें तो प्रश्न तसाच ठेवला. विद्याधरनें माझ्यासाठीं कांहीं निरोप किंवा चिठ्ठी ठेवली आहे कीं काय हें विचारायचें होतें, पण तसें विचारणें गैर दिसेल म्हणून ती कांहीं बोलली नाहीं! मात्र तिला मनांतून विद्याधरचा खूप राग आला. त्याच्या एकाएकी जाण्याचें काय कारण असावें हेंच तिला समजेना. तार कुणाची असावी व एवढें कसलाही निरोप न ठेवतां गडबडीनें जाण्याइतकें महत्वाचें काय काम असावें याचाही तिला उमज पडेना. कदाचित् डोरोथीनें तर त्याला बोलावलें नसेल ना? आणि ती कल्पना मनांत येतांच ती स्वतःशीं खूप अस्वस्थ झाली.

तो दिवस तिचा एकंदर निरुत्साहाचाच गेला. विद्याधरवर ती मनांतून खूप चिडली होती व तो दोन दिवसांत परत न आल्यास आपण परत मुंबईची वाट धरायची असा तिनें निश्चयही केला होता.

---

पण तो निश्चय तिला पार पाडण्याची जरूरच भासली नाहीं! कारण दुसऱ्या दिवसांचीच गोष्ट!–ती नेहमीप्रमाणें पहाटे उठून स्नानगृहांत गेली असतां बाहेरच्या दारावर कुणीतरी तीन टिचक्या वाजवल्याचा तिला आवाज आला. माधवी घाबरली व तिनें दबकत विचारलें.

"कोण?"

"ओळखूं येत नाहीं तुला?"

असें म्हणून विद्याधरनें दारावर पुन्हा तीन टिचक्या वाजवल्या. आतां मात्र तिनें विद्याधरची खूण ओळखली व त्या आनंदाच्या भरांत खांद्यावरचा तांब्या तसाच वेडावाकडा पालथा करत तिनें विचारलें

"तुम्ही केव्हां आलांत विद्याधर!"

"बाहेर ये म्हणजे सांगतों!"

"बरं! बसा तुम्ही हॉलमध्यें!"

"हो! लवकर ये!"

असें म्हणून तो निघून गेला. माधवीचें हृदय आनंदानें थड-थडत होतें व आपले हात आपल्या पुष्ट उरोजापाशीं दाबून धरत ती स्वतःशीं पुटपुटली "हे केव्हां आले बाई!"

ती दिवाणखान्यांत आली तेव्हां तिचे केस अद्याप सोडलेलेच होते व नुकतेंच नवीन वस्त्र नेसल्यामुळें तिच्या शरीरावर आणि

चेहऱ्यावर जी निर्मल कांति आली होती तिच्याकडे विद्याधरला पहात रहावेसें वाटलें. माधवी आली, ती ड्रेसिंग टेबलासमोर उभी राहिली व समोरचा एक कंगवा उचलत तिनें विचारलें

" तुम्ही कॉफी घेतलीत ? "

" छे ! आज खास त्याच्यासाठीं तुझ्याकडे आलोंय् ! आल्यावर नंदून सांगितलं कीं तू खूप रागावली आहेस, तेव्हां म्हटलं अगोदर टेंपरेचर पाहून घ्यावें—"

" पुरुषांना किनई लपवालपवी फार छान साधतें हं ! "

" असं काय मधु ? हें पहा ना ! "

असें म्हणून विद्याधर उठला व माधवी पुढें जाऊन त्यानें तारेचा एक फॉर्म धरला.

" Meet me to-day urgently in connexion with second edition of your book The Nature and the Beauty. I want it on liberal termes.

Dinkar Madhav Treasury of Books,
Fort.

' निसर्ग आणि सौंदर्य ' ह्या आपल्या पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रकाशनाबाबत मला आजच भेटा. मला हें पुस्तक हवें आहे.

दिनकर माधव ट्रेझरी ऑफ बुक्स "

" म्हणजे ? भैय्यासाहेबांची ही तार ! "

तार वाचून होतांच माधवी आश्चर्यानें उद्गारली.

" मग सांगतों काय ? तार अगोदर गेली लोणावळ्याला ! डोरोथीनें घेतली, आणि लगेंच पुन्हा मला तशी तार केली. तरी मला एक दिवस उशिरच झाला ! "

" पण मी म्हणतें दादांना तुमचा पत्ता मिळाला कुठें ? "

" तें आतां मला काय माहित ? पण धंद्याच्या लोकांना या गोष्टी कळतात. माझ्या प्रकाशांनींही मला पत्र पाठवलें होतें पण मी ' पाहूं ' म्हणून स्वस्थ बसलों होतों. पण आतां एवढया मोठया प्रकाशकाची व तीही तारेनें मागणी आल्यावर—"

" तर तर ! " माधवी मान वेळावत म्हणाली.

"मला कल्पना होती, मधू, तूं रागावशील म्हणून ! पण आतां हें पहा, " असें म्हणून त्यानें तिच्या हातांत कॉंट्रॅक्ट फॉर्म दिला, " पण हें दाखवल्यावर तूं स्वस्थ राहशील अशी माझी कल्पना होती. मला गडबड तर झालीच, पण म्हणूनच मी तुला चिठ्ठी किंवा निरोप न ठेवतां निघून गेलों ! माझी खात्री आहे कीं आतां तूं रागावणार नाहींस ! "

" पण एका गोष्टीचा मात्र मला राग येणार ! "

" कोणता ! "

" तुमच्या पुस्तकाबद्दल भैय्यासाहेबांना मी लिहणार होतें. पण माझा तो मोका तुम्ही हुकवलात ! "

" वा ऽ वा ! " विद्याधर हंसत हंसत म्हणाला " पण भैय्यासाहेबांना याची काय कल्पना ? माझ्या पुस्तकासाठीं बऱ्याच ऑर्डर्स बाजारांत तुंबून आहेत असें त्यांनीं पाहिलं, आणि मला तार केली ! "

" इतकी कां मागणी आहे त्या पुस्तकाला ? "

कॉफीचे पेले ठेवत माधवीनें प्रश्न केला. तिची चर्या थोडयाशा अभिमानानें विद्याधरकडे रोखून पहात होती. विद्याधरनें तिच्या प्रश्नाचें

उत्तर दिलें नाहीं. पण कॉफीचे घोट घेत असतांना तो स्मितपूर्वक हंसला मात्र !

दुसरा दिवस !—आज माधवीच्या परिक्षेचा निकाल होता. सायंकाळीं सात वाजतां युनिर्व्हसिटी हॉलमध्यें निकाल प्रसिद्ध होणार होता. माधवीला खात्री होती कीं भैय्यासाहेब तार करतील, पण सायंकाळची वेळ उलटून रात्र पूर्ण जवळ येऊन ठेपली तरी तिला कशाचाच पत्ता नव्हता. तिनें विद्याधराची चौकशी केली, पण आज तोही कुठें बेपत्ता झाला होता.

" हे कुठें गेले बाई ! " ती स्वतःशीं पुटपुटली, " कां आज माझा रिझल्ट आहे हें त्यांना माहित आहे ! "

आपल्या या कल्पनेचें तिला हंसू आलें व ती थोडी बेचैनहि झाली. विद्याधरला बोलता बोलता तिनें एकदा आपला नंबर व निकालाची तारीख सांगितली होती. पण त्यानें ती कितपत ध्यानांत किंवा लक्ष्यांत ठेवली असेल याची तिला शंका होती. विद्याधर तिच्याशी वागे, पूर्ण मोकळेपणानें वागे; तिच्या सौंदर्याची व पर्यायानें तिच्या गुणाचीही तो थोडीफार स्तुती करे, पण तरीही माधवीला वाटें कीं त्याच्या मनाचा असा कांहीं राखीव भाग असावा कीं त्यांत अद्याप आपणांस प्रवेश मिळालेला नसावा.

चांदण्यांत ती त्याच्या बरोबर हिंडायला जाई, किंवा तिथेंच बंगल्याभोवतालच्या कुंजांत तो माधवीशी बोलत बसे. चांदण्याचें त्याला अत्यंत वेड होतें, पण तिथेंही बोलतांना तो म्हणे—

" चांदणें सुंदर आहेच, पण तुझ्यामुळें तें जास्त सुंदर दिसतें आहे मधु ! "

" म्हणजे काय ? " त्याचें बोलणें ऐकून माधवीला थोडेंसें लाजल्याप्रमाणें होई व त्याच्या सहज व सुंदर हालचालीकडे ती पहात राही.

" म्हणजे असं ! " तो पुढें म्हणे " कीं चांदण्यामुळें तूं सुंदर नसून चांदणें तुझ्यामुळें सुंदर दिसते आहे ! "

" ही गोष्ट तुम्हाला लागू असताना तुम्ही विनाकारण माझ्यावर कां ढकलता ? "

" वा ऽ ! तूं असं म्हणतेस मधु ! तुझ्या सहवासाचा, सौंदर्याचा आणि गुणांचा मोह मला अवीट वाटतो ! वाटतं, असंच चांदणं रहावं, तूं माझ्याकडें आणि मी तुझ्याकडें पहात कायमचे बसावे ! "

" इश्य् ऽ " माधवीच्या गालावर लाली चमकली व ती त्याच्याकडें पहात म्हणाली " इंजिनीअर साहेब आतां कवि व्हायला लागलेले दिसतात ! "

विद्याधर यावरही कांहीं बोलला नाहीं, पण फक्त तिच्याकडें पाहून हंसला.

असले ठळक ठळक प्रसंग तिच्या नजरेपुढें उभे रहात व त्यांच्या सुखद आठवणींनीं तिला फार आराम मिळाल्यासारखा वाटे, पण मध्येंच तो बोलता बोलता डोरोथीचें ओझरतें नांव काढी व माधवी अस्वस्थ होऊन जाई ! डोरोथीबद्दल तिच्या मनांत अत्यंत आदर होता, व तिच्या सौंदर्याबद्दल तर वादच नव्हता व म्हणून माधवीला मधेंच शंका येई कीं ' विद्याधर आपणांशी दुटप्पीपणानें वागतो आहे कीं काय ? ' आणि असे विचार मनांत येतांच तिच्या अंतःकोषांत नुसती खळबळ उडून जाई व ती विकल होऊन स्वस्थ राही.

आतांही तिच्या मनांत असेच विचार चालले होते–पण इत-क्यांत हॉलमध्यें तिला विद्याधरचा आवाज ऐकूं आला. तिला आश्चर्य वाटलें, व 'इतक्या रात्रीं हा कशाला आला बाई !' असें ती स्वतःशीं म्हणते तोंच द्वारकाकाकूंनीं तिच्या खोलीवर थाप मारली.

"काय ग मावशी !"

"जागी आहेस ना ! तुला खालीं विद्याधर बोलावताहेत !"

"आलें हं !"

आणि ती दिवाणखान्यांत पाऊल टाकते तोंच विद्याधर तिच्या पुढें येऊन म्हणाला

"मधू, तूं पास झालीस ! कॉंग्रॅटस् !"

"खरं" माधवीला तें खरं सुद्धां वाटेना.

"तर ! हें पहा ना !" असें म्हणून त्यानें हातांतला एक कागद तिला दाखवला.

त्याच्यावर तिचें नांव, नंबर व 'Passed in Second Class' एवढे शब्द होते.

"मी आज संध्याकाळपासून याच नादांत होतों मधु ! एक्स्चेंज—मधें माझा एक मित्र ओळखीचा आहे. सात वाजल्यापासून मी त्याच्या ऑफीस मधें ठिय्या मांडला होता. पण हा कांहीं फार विशेष (famous) रिझल्ट नव्हे व म्हणून तो मला कळायला उशिर लागला आणि सरतेशेवटीं आत्ता मिळाला. मिळाल्यावर मी दोनदा विचारून खात्री करून घेतली, आणि ताबडतोब इकडे आलों !"

माधवीनें त्याच्याकडें पाहिलें. तिचें मन आनंद, कृतज्ञता आणि प्रेम ह्यांनीं कांठोकांठ भरून आलें होतें. तिला शब्द व्यक्त करता येत नव्हते व ती आदरानें त्याच्याकडें पहात होती. त्यानें आज तिच्यासाठीं एवढें कार्य केलें होतें व त्याचें परावर्तन तिच्या चेहऱ्यावर झालेलें पाहून त्याला समाधान वाटलें.

थोडया वेळानें तो उठला व जातांना फाटकांपाशीं तो तिला म्हणाला

" पण उद्या आम्हाला याचं बक्षिस पाहिजे हं ! "

" जरूर ! " माधवी उल्हासानें उद्गारली " नंदु, तुम्ही, काकू उद्यां इकडेच जेवायला या ! "

" राणीसरकार स्वतः स्वयंपाक करणार आहेत ? "

" वा ! जरूर ! " माधवी त्याच्या या शब्दानें चांगलीच दच-कली, पण लगेच स्वतःला सावरून घेत तिनें त्याच्याकडे पहात उत्तर दिलें.

" नक्की या ! मी दुध्या हलवा करीन ! तुम्हाला आवडतो ना ?"

" खरं ! " विद्याधरलाही हर्ष झाला व तो तिच्या चेहऱ्याकडे पहात उद्गारला.

विद्याधर निघून गेला व माधवी उल्हसित मनानें पुन्हा आपल्या झोपण्याच्या खोलींत गेली. तिच्या मनांतले विषादाचे ढग आतां सारे मावळले होते व विद्याधरच्या हेतूबद्दल तिला खात्री वाटत होती. ती मोठया प्रसन्न मनानें उद्यांचा विचार करूं लागली व ती स्वतःशीं म्हणत होती आकाशी रंगाचें जरीचें पातळ नेसून त्यावर आपण पिवळा ब्लाऊझ घालूं ! विद्याधरला तो फार आवडतो ना ! आणि

उद्यांच्या गडबडींत आपण हळूच त्याला विचारूं—" ती हंसली. तिचे कुंदकळ्यासारखे दांत क्षणभर दीप्तीमान झाले व ती पुन्हा स्वतःशीं म्हणाली, काय तरी बाई आपले विचार !—

पण तिची ही गोड तंद्री फार वेळ टिकली नाहीं. दाराशी पुन्हा खडखडाट झाला व माधवीनें डोकावून पाहिलें. तारवाला उभा होता. "तरीच मी म्हटलं !" ती आनंदून स्वतःशी म्हणाली "आमचे दादा चुकायचे नाहींत !"

असें म्हणून ती खालीं गेली. पण तारवाल्यानें तिच्यापुढें एका ऐवजी दोन तारा केल्या तेव्हांमात्र ती बावरली. तिनें सही करून त्या घेतल्या व फोडल्या. तिची कल्पना बरोबर होती. एक तार भैय्यासाहेबांची होती व त्यांनीं म्हटलें होतें

Passed Second class. Double Congratulations, letter follows.

दुसऱ्या वर्गात पास. दुहेरी अभिनंदन. पत्र येत आहे.

नंतर तिनें दुसऱ्या तारेकडे पाहिलें.

Lovely & Sweet Hearty Congratulations

Chauchank D. Deshmukh
Asstt. Governor

गोड मधुर आणि हार्दिक अभिनंदन

शशांक डी. देशमुख
असिस्टंट गव्हर्नर

तिला अर्थच लागेना या दोन्ही बातम्यांचा ! भैय्यासाहेबांनीं दुहेरी अभिनंदन करायचें काय कारण व तें कसलें पत्र पाठवणार आहेत ? आणि ही दुसरी तार कुणाची ? Chauchank या नांवा-

कडे ती बराच वेळ पहात बसली व पुढें पाहिल्यानंतर तिला आठवलें कीं 'हे शशांक देशमुख !' पण ह्यांनीं आपल्याला कां तार करावी, बरं कली तर केली, पण तारेंत असिस्टंट गव्हर्नर म्हणून लिहण्याची काय जरूरी ? आपण लोणावळ्याला जात असतांना बोरीबंदरवर भैय्यासाहेबांशी उभ्या आडण्या गप्पा मारणारा हा मनुष्य माधवीच्या नजरेस्समोर उभा राहिला ! पण त्यानें आपणाला तार कां पाठवावी ?

दुसरे दिवशीं पहिल्या डाकेला तिला भैय्यासाहेबांचें पत्र मिळालें व त्यांत सारा खुलासा होता. शंशाकनें तिला मागणी घातली होती व एवढया मोठया गृहस्थानें मागणी घातलेली पाहून भैय्यासाहेबांना फार आनंद झाला होता. त्यांनीं ती आनंदानें मान्य केली होती व माधवीचें त्याबद्दलही अभिनंदन करून त्यांनीं लिहलें होतें 'आतां तूं पहिल्या गाडीनें मुंबईला ये ! द्वारकाकाकू व सदाशिवरावांना घेऊन ये, म्हणजे लगीनघर आत्तापासूनच सजायला सुरवात होईल !'

भैय्यासाहेबांना वाटत होतें कीं आपण माधवीचें फार मोठें हित करीत आहोंत—पण तें वाचून इकडे माधवीवर दुःखाचा डोंगर कोसळल्याप्रमाणें झालें होतें. ती आपल्या मावशीच्या मांडीवर मान ठेऊन ओक्साबोक्शी रडत होती व तिची समजूत कशी काढावी याचा द्वारकाबाईंना प्रश्न पडला होता.

विद्याधरला त्याच्या इंजिनीअरनें तावडतोब बोलावलें होतें व तो निघून गेला होता.

माधवी त्याच संध्याकाळचें गाडीनें मुंबईस रवाना झाली.

---

## ११ : : एरॉसमधें

माधवीनें आपल्या घरांत पाऊल टाकलें व एरवी शांत व सलो-ख्यानें चालणाऱ्या त्या घरांत एकाएकी बॉंबस्फोट झाला. माधवीनें आपला नकार चक्कपणें भैय्यासाहेबांना कळवला व तो ऐकून ते अगदीं थिजून गेले होते. माधवीच्या बद्दल त्यांच्या फार निराळ्या कल्पना होत्या व ती असें कांहीं करेल अशी त्यांना कल्पना नव्हती. माधवीनें हित आपण फार व्यवस्थित रीतीनें पाहू शकतों व आपलें म्हणणें ती कोणत्याही तऱ्हेनें अमान्य करेल असें कांहीं त्यांना वाटलें नव्हतें. माधवी म्हणजे एक अल्लड साधी भोळी अर्धोन्मिलित जाईची कळी आहे असें त्यांना वाटत होतें, व तिनें असा बंडाचा झेंडा उभार-लेला पाहून ते कमालीचे आश्चर्यचकित झाले, अगतिक झाले. त्यांचा स्वाभिमान जागा झाला व माधवीची त्यांना थोडया प्रमाणांत चीडही आली. माधवीच्या बाबतींत त्यांचा आत्मविश्वास जबरदस्त होता व त्या भरांत शशांकची मागणी त्यांनीं मान्यही करून टाकली होती. अशा परिस्थितींत माधवीनें ‘ नाहीं ’ म्हणावें म्हणजे त्यांना फार चमत्कारिक वाटत होतें.

ते दोन दिवस माधवीशी कांहीं बोललेच नाहींत पण तिसऱ्या दिवशीं जेऊन दुकानाला जातांना त्यांनीं तिला हांक मारली.

“ बैस ! ” ती आल्यावर ते तिला उद्देशून म्हणाले.

ते आणखी दोन मिनिटें स्वस्थ राहिले व टेबलावरची सुपारीची चिमूट पुन्हा थोडी तोंडांत टाकत ते म्हणाले

" मधु ! शशांकपेक्षांही योग्य असा दुसरा कोणता तरुण तुझ्या पाहण्यांत आहे कां ? "

माधवी गोंधळली. शरमेनें चूर झाली. तिच्या कानाचीं पाळें लाल होऊन गेली व थडथडत्या हृदयानें तिनें भैय्यासाहेबांकडे पाहिलें. तिच्या ओठांत एक होतें. पण कृतींत दुसरेंच आलें व ती मानेनें नकार दर्शवून गेली.

" मग त्या परिस्थितींत, " भैय्यासाहेब पुढें म्हणाले " तुला शशांक कां नकोसे वाटतात ? अशी कोणत्या तऱ्हेनें तुझी व त्यांची ओळख आहे, कीं एकदम त्यांना तूं 'नाहीं' म्हणावंस!"

" तोच प्रश्न आहे भैय्यासाहेब " माधवी उत्तरली " कोणताही परिचय नसतांना मी एकदम त्यांना पसंत कसें करावें ? प्रथमदर्शनीं माझा जो त्यांच्याबद्दल ग्रह झाला आहे त्यावरून माझें मत त्यांच्याबद्दल चांगलें नाहीं ! "

" ते फार श्रीमंत आहेत मधु, मानाच्या जागेवर आहेत आणि तुझ्या मुठींत राहतील ! "

यावर माधवी हंसली व आपली जिव्हणी थोडीशी चावून धरत थोड्या स्वस्थपणें म्हणाली,

" पण असेच प्रियकर आजकालच्या पोरींना आवडतात असें तुम्हांला कोणी सांगितलें भैय्यासाहेब ? सर्वस्वी मुठींत राहणारा नवरा असेल तर तो निदान मला तरी आवडणार नाहीं ! आणि श्रीमंती

म्हणाल तर ती कांहीं पात्रता नाहीं, व शिवाय आपली श्रीमंती तुम्ही कुणाला देणार आहांत भैय्यासाहेब ! "

हें ऐकून भैय्यासाहेब हंसले व थोडेंसें तिरक्या नजरेनें तिच्याकडें पहात म्हणाले

" तूं फार हुषार आहेस ताई ! पण मी त्यांना रुकार दिलेला आहे ! "

"हा माझ्या आयुष्यांतला अखेरचा आणि महत्वाचा प्रश्न आहे दादा ! "

यावर भैय्यासाहेब निरुत्तर झाले, व ते उठत म्हणाले " पण तूं असें एकदम बोलूं नकोस ! मी यांतून तोड काढतों. तूं शशांकचा थोडा सहवास पहा, आणि नंतर मला सांग ! अं ऽ ! "

यावर माधवीला नाहीं म्हणणें शक्यच नव्हतें. तिनें मान हलवली व भैय्यासाहेब थोडयाशा प्रसन्न मुद्रेनें फर्मकडें निघून गेले.

दुसरे दिवशीं दुपारीं माधवीला शशांकचा फोन आला.

" कोण ? " भैय्यासाहेब अशा समजुतीनें माधवी बोलूं लागली.

" कोण मिस् जोशी ! " माधवीनें आतां मात्र शशांकचा आवाज ओळखला.

" होय ! " मृदु आवाजांत माधवी उत्तरली.

" गुड् आफटर नून ! हें पहा आज संध्याकाळीं आपल्याला वेळ आहे कां ? "

" कां ? हो ! "

" मी बँकेतून परस्परच आपणाकडें येईन, आपण त्यानंतर सोराब म्हणून माझ्या मित्राकडे जाऊं ! त्याचं नवीनच लग्न झालेलं

आहे व त्यानें अगत्यानें आमंत्रण दिलेलें आहे. बरेच मोठमोठे लोक येणार आहेत !"

"पण मी कशी येऊं शकेन !"

"कां ?"

"माझी कुठली ओळख ?"

"हात्तिच्या !" टेलिफोनच्या नळींतून शशांकच्या हंसण्याचा आवाज आला "अहो मी ओळख करून देईन ना !"

"नाहीं, तसं नाहीं हो ! पण, म्हणजे मला आमंत्रण ?"

"हां हां ! असं होय !" तो आणखी मोठमोठयानें हंसल्याचा आवाज आला "मी त्याची व्यवस्था केली आहे ! तुमचें आमंत्रण कार्ड माझ्याजवळ आहे !"

"हं ! मग कांहीं हरकत नाहीं !"

"मग मी येऊं ना !"

"या ना !"

संध्याकाळीं शशांकबरोबर ती रुस्तूम मसानीच्या घरीं पार्टीला गेली व सुरवातीच्या थोडया वेळांतच माधवीला कळून आलें कीं शशांकबद्दल आपण ज्या आपल्या पहिल्या कल्पना केल्या होत्या त्याच बरोबर आहेत. तो सुविद्य होता. सुशिक्षित होता. आज एका मानाच्या जागेवर ऑफिसर होता व त्या लाईनीतली त्याची बुद्धिमत्ता वाखाणण्यासारखी होती. बँकेतले बरेच बडे ऑफीसर्स पार्टीला हजर होते व त्यांच्याबरोबर शशांकचीं जीं संभाषणें होत त्यावरून माधवीला सहज कळून आलें, कीं तो एक बुद्धिमान गृहस्थ आहे व त्याला मानही सर्वत्र चांगला मिळत होता. पण तो आत्मस्तुतिपर होता व

अहंमन्य होता. त्याच्या बरोबरीच्या लोकांनीं त्याला मान दिला कीं तो सफाईदार इंग्रजींत त्यांच्याशीं दोनचार वाक्यें बोलें व नंतर माधवी-कडे पाहीं !

त्याचा पोशाक त्याच्या दर्ज्याला शोभेसा होता. उंची फ्लॅने-लचा सूट घातला होता त्यानें व डोक्यावर किंचित् तिरपी फेल्ट हॅट चढवली होती. त्याचा रुबाब, बोलण्याची व वागण्याची पद्धत—सारेंच कांहीं पाश्चात्य पद्धतीवर होतें. त्या मानानें माधवीनें फारच साधा पोशाक केला होता. पण त्यांतही ती इतकी खुलून दिसत होती कीं त्या मिश्र समाजांतल्या कित्येक नजरा तिच्यावर खिळून रहात होत्या व तिला बरोबर घेऊन हिंडतांना शशांकला स्वर्ग फक्त दोनच बोटें उरल्याप्रमाणें वाटत होतें.

शशांक स्वतःही त्या मानानें फार सुंदर होता व त्या उंची पोशाकांत व तेथील नील-धूसर प्रकाशांत तर तो फारच खुलून दिसत होता. विद्याधरशीं तुलना करताना तो कितीतरी पटीनें उजवा आला असता, पण तरीही माधवीला त्याचा स्वभाव आवडला नाहीं. त्याचा डौल, बोलण्याची तऱ्हा व विशेषतः स्त्रियांच्या पुढें पुढें करण्याची त्याची लाघवी वृत्ति तर माधवीला मुळींच पसंत पडली नाहीं. त्याच्या दर्ज्याला आणि वेशाला त्याचें वर्तन पूरक नाहीं असेंच तिला वाटलें.

“ तुम्ही पाश्चात्य देशांत कधीं होता कां हो ? ”

व्यवस्थित इंग्रजी ऊच्चार करण्याची त्याची धडपड पाहून माधवानें एकदां त्याला विचारलें.

“ तेवढीच एक बाकी आहे हो ! ” तो मान लववून तिच्याकडें पहात उत्तरला “ पण त्याचीही भरपाई करण्याचें मी ठरवलें आहे ! ”

" तें कसं काय ? "

" लग्नानंतर मी परदेशीं जायचं ठरवलं आहे ! आमच्या बँकेनं मला ब्रिटनला पाठवायचं कबूल केलं आहे ! तिथें एक दोन महिन्यांचा छोटासा कोर्स मला संपवायचा आहे. आणि येतांना आपण पॅरीस स्वित्झर्लंड आणि वॉशिंग्टन करून येऊं ! त्याकरतां हा कोर्स संपवल्यावर मी सहा महिन्यांची रजा घेणार आहे व त्याचीही तरतूद मी करून ठेवलेली आहे. प्रश्न एवढाच आहे कीं हें सर्व शक्य तितक्या लवकर व्हायला पाहिजे. लढाई जसजसी जोरांत येईल तसतसें हें कठीण होत जाईल ! आणि म्हणूनच मी—लक्ष्यांत आलें ना मी काय म्हणतों तें ! "

असें म्हणून त्यानें माधवीकडें पाहिलें. माधवी थोडया सूक्ष्म नजरेनें त्याच्याकडे पहात होती व तो आपल्या उत्तराकरतां थांबला आहे असें दिसून येतांच तिनें ' सारें समजलें ' अशा अर्थानें मान डोलावली. शशांकला तेवढेंच हवें होतें व तिनें मान डोलावलेली पाहून तो खुषीनें पुढें चालूं लागला.

तो माधवीला फार मान देण्याचा प्रयत्न करी व तिच्या बारीकसारीक गोष्टीकडे आपलें लक्ष्य आहे असें तो दाखवी. शशांक आज एका सुंदर पोरीबरोबर हिंडत आहेत असें पाहून कांहीं लोक त्याच्याकडें येत व त्यांच्या खोचक प्रश्नांना उत्तरें देतांना तो बेज़ार होई. माधवीनें त्याला बजावून सांगितलें होतें म्हणून, तरी पण ती ' एक आपली मैत्रीण ' आहे अशी तिची ओळख करून देतांना त्याला थोडें जड वाटल्याखेरीज रहात नसे. तरी एका बहाद्दरानें त्याला छेडलाच !

" हॅलो ! कॉंग्रॅच्युलेशन्स मि. देशमुख ! " त्या व्यक्तीनें मागून त्याच्या पाठीवर थाप मारत म्हटलें.

" हॅलो ! थॅक्स ! " तो बोलण्याच्या भरांत सहजपणें बोलून गेला, पण नंतर त्याला वाटलें असावें कीं हें आपण काय बोलतों आहोंत, कारण लगेच तो थांबून म्हणाला " कॉंग्रॅच्युलेशन्स ! कशासाठीं ! "

त्यावर त्या व्यक्तीनें हसून माधवीकडे नजर टाकली.

" ओ ऽ ! " तिच्याकडें पाहून शशांक हंसत हंसत म्हणाले " She is my friend, Miss Joshi, daughter of Dinkar Joshi, a famous capitalist & Book publisher from Fort ! " ह्या मिस जोशी, दिनकरराव जोशांची कन्या. हिचे वडील फोर्टमधलें मोठे व श्रीमंत बुक-सेलर आहेत ! "

" ओ ऽ ! " यावर त्या व्यक्तीनें थोडा वांकडा चेहरा केला व पुन्हां थोडया वेळानें विचारलें " She is related to you ? " ( तिचें आणि तुमचें कांहीं नातें आहे वाटतं ? " )

" येस ! " शशांक प्रथम उद्गारले, पण नंतर त्यांना काय वाटलें कुणास ठाऊक, लगेच ते मोठया गडबडीनें उद्गारले " No, no, no, not from that view. She is my friend only छे ! छे ! छे ! तसं कांहीं नाहीं ! ती माझी नुसती मैत्रीण आहे ! " )

यावर त्या ऐकणाऱ्या व्यक्तीलाही थोडें गूढ पडलें, तो थोडासा हंसत " oh ! I See ! oh, I See ! ( असं होय ! असं होय ! " ) असें करीत निघून गेला.

विद्युद्दीपाच्या झगझगाटानें व ग्लोब्सच्या रंगीबेरंगी प्रकाशानें हॉल नुसता गजबजून गेला होता. निरनिराळ्या व्यक्तींचें निरनिराळे पोषाख व त्यांच्यावर त्यांनीं शिंपडलेलीं सुवासिक द्रव्यें यांनीं तेथील वातावरण धुंद व प्रमत्त होऊन गेलें होतें.

दुसऱ्या दिवशीं माधवी जुहूच्या वाळवंटावर गेली होती. तिसरें दिवशीं शशांकनें आपली मोटार साऱ्या मुंबईतून हिंडवली होती व माधवी नको नको म्हणत असतां त्यानें कांहीं मोलवान जिनसा खरेदी केल्या होत्या.

त्याच्या अत्यंत आग्रहावरून त्यानें दिलेली सिल्कची साडी पेहरून ती त्या दिवशीं त्याच्याबरोबर एरॉसला गेली होती; व तिथें तिनें विश्रांतिच्या वेळेला जें पाहिलें तें पाहून तिला मोठा धक्का बसला.

तिथें विद्याधर बसला होता, व त्याच्या उजव्या बाजूला डोरोथी होती.

---

# १२ : : स्विमींग कॉम्पिटीशन

तें पाहून तिनें झटकन् मान वळवली व तिच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले.

विद्याधरवर ती जितक्या एकनिष्ठपणें विसंबून होती त्याच्यावर एकप्रकारें घालाच नव्हता कां हा ? विद्याधरनें मुंबईंत यावें, डोरोथी-बरोबर सिनेमा पहाण्यास यावें व आपली त्याला आठवणही होऊं नये याचें तिला फार वाईट वाटलें. तिचें मन सिनेमांत रमेना व तिनें शशांकला सुचवलें ' घरीं जाऊं या ! '

" कां ? सिनेमा चांगला नाहीं ! "

" तसं कांहीं नाहीं ! पण माझें थोडें डोकें दुखतें आहे !"

" अरे वा ! मग चला ! "

शशांक घाईघाइनें उठला व त्याची ती तत्परता पाहून माधवीला हंसूच आलें. लगेच तिच्या मनांत आलें, ' विद्याधर कांहीं असा वागला नसता ! '—पण तिनें स्वतःच्या मनाला आवरलें व ती घरीं आली.

लोणावळ्याहून ती तडकाफडकीं परत आली होती, व पुण्याहून येतानाही त्याच प्रकाराची थोडीफार आवृत्ति झाली होती. विद्याधरला भेटणें तिला शक्य झालें नव्हतें, तरी पण मुंबईला आल्यानंतर तिनें त्याला लोणावळ्याच्या पत्यावर पत्र पाठवलें होतें, व त्याचें उत्तर

आपण अपेक्षित असतां, त्यानेंच स्वतः दिसावें, पण अशा निराळ्या परिस्थितींत हें पाहून तिला फार धक्का बसला होता.

तिचें मन बरेंच उदास झालें व शशांकबरोबरहि ती दोनतीन दिवस अशा तऱ्हेनें वागली कीं त्यानेंही विचारलें

" तुम्हाला अलिकडे कांहीं त्रास होतो आहे कां ?"

" छे ! छे ! " स्वतःला सांवरत तिनें उत्तर दिलें. पण तिला पुन्हा आश्चर्य वाटलें " शशांकच्या हें कसें लक्ष्यांत येतें ? "

भैय्यासाहेबांनीं तिला साधारणपणें पंधरा दिवसांची मुदत दिली होती. व शशांक त्या मुदतींत हरप्रकारें तिच्याकडें लक्ष्य देऊन तिची मर्जी संपादण्याचा प्रयत्न करत होता. स्त्रियांशीं त्याचें वागणें एका विशिष्ट प्रकारचें होतें व तसें वागणें कांहीं तरुणींना फार आवडलें असतें. पण शशांकच्या दुर्दैवानें माधवी तशा प्रकारची तरुणी नव्हती. पण तरीही दिवस जाऊं लागले तसतसें शशांककडें तिचें लक्ष्य अधिक जाऊं लागलें व इतक्या दिवसांतही विद्याधरचा अजून कांहींच पत्ता नाहीं हें पाहून ती अधिकच अस्वस्थ होऊं लागली.

अशा परिस्थितींत शशांक एका संध्याकाळीं तिच्याकडें मोठया उत्साहानें आला व मोठया घाईघाईनें तो म्हणाला

" आज मी तुम्हाला एका फार उत्तम ठिकाणीं नेणार आहे ! "

" असं ! " त्याच्या बोलण्याचें हंसू येत माधवी उद्गारली.

" कुठें ? "

" कॉरोनेशन पूल !"

" तुमचा काय आज पोहायचा विचार आहे ? " तिनें थोड्या आश्चर्यानें विचारलें.

" कुणाचा ? माझा ! छे ! मी फक्त आमच्या घरच्या टबमधेंच पोहूं शकतों ! तशी मला पाण्याची फार भिती वाटते. पण आज तिथें पोहण्याचे सामने चालूं आहेत, व आज त्याची फायनल आहे. कुणी डोरोथी नांवाची मुलगी— "

" काय म्हणालांत ? " माधवीनें इतक्या जोरांत विचारलें कीं नंतर तिलाच वाटलें कीं आपला आवाज फार मोठा झाला कीं काय म्हणून तिनें हळूंच विचारलें

" डोरोथी ! कोण ही डोरोथी ? "

" तें कुणास ठाऊक बुवा ! पण फार अप्रतिम 'स्विमर' आहे असं म्हणतात !"

" असं ! "

माधवी स्वतःशीं उद्गारली. पण तसें म्हणतांना तिच्या मनांत अनेक शंका कुशंका येऊन गेल्या. आणि ती कॉंपिटीशन पूलपाशी येऊन दाखल झाली तेव्हां तिला कळून आलें कीं आपणांस आलेली शंका योग्य आहे. ती डोरोथीच होती.

कॉरोनेशन पूल म्हणजे पोहण्याची फार व्यवस्थित जागा होती. दीडशें फूट लांब व चाळीस फूट रुंदीचा तो तलाव होता व त्याच्या वरच्या कांठांवर चारी बाजूंनीं प्रेक्षकांची बसण्याची व्यवस्था दोन रांकाच्या हिरव्या हिरव्या रंगाच्या खुर्च्यांनींच कली होती व शर्यती-च्या वेळेला दोन्ही बाजूंनीं दुतर्फा तो पूल फुलून जाई तेव्हां तें दृश्य

फार मनोवेधक वाटे. आज त्या पूलाच्या कमानीवरून रंगीबेरंगी फितींच्या माळा गुंडाळल्या होत्या व मधून मधून पाण्यावर संथ प्रकाशाचे झोतही पाडण्यांत आले होते. पाणी स्वच्छ होतें व आंत सुमारे सहा फुटांपर्यंतची वस्तू स्वच्छ दिसत होती.

बँडगृहांत बँडवादन चालूं होतें व प्रेक्षकांत युरोपियन व पार्शी समाजच खूप होता. त्यांचे ते गुडघ्यापर्यंतच असलेले झगे, बॉब केलेला केशभार व त्या आंग्ल युवती गडबडीनें व मोकळेपणानें आपल्या प्रियकरांशी बोलत तें पाहून माधवीला विद्याधरची आठवण झाल्याखेरीज राहिली नाहीं.

कांठावर सहा पुरुष व तीन स्त्रिया उभ्या होत्या. डोरोथी सर्वांच्या मध्यभागीं होती व भडक निळ्या रंगाची पिवळी किनार असलेली चड्डी तिनें वापरली होती. तिच्या गौर आणि रक्त वर्णाला तो वेष फारच खुलून दिसत होता व श्वास रोखून ती तयारींत उभी होती. तिचा चेहरा प्रसन्न होता व तिच्याकडें पाहून माधवीलाही थोडी असूया वाटल्याखेरीज राहिली नाहीं.

सांकेतिक खूण वाजतांच त्या सर्वांनीं धडाधड उड्या घेतल्या व शांत असलेल्या त्या जलाशयांत प्रचंड खळबळ सुरू झाली व आंत उडालेल्या झोताचे तुषार प्रेक्षकांच्या पायापर्यंत येऊन पोचले. पाण्यांतील हालचाल स्पष्ट दिसत होती व सुरवातीस सारे उमेदवार आंतूनच पोहत होते. सुमारे निम्म्या भागापर्यंत दोन तरुण जाऊन पोचले व ते तेथें पोचल्यावर त्यांना दिसून आलें कीं डोरोथी अद्याप आपल्यापुढेंच आहे.

आतां त्या तिघांची खरी धडपड सुरू झाली व त्यांचे हात व त्यांचें कौशल्य यांकडे सर्वांचें लक्ष्य लागलें. डोरोथी एकाद्या मत्स्यकन्ये-प्रमाणें चमकत होती व तिचें श्वेत शरीर पाण्याच्या फेसळींत सरसर पुढें जाई कीं तिच्या कौशल्याकडें पाहून माधवीपण चकित झाली.

डोरोथी पहिली आली होती. तिच्यावर अभिनंदनाचा वर्षाव चालला होता व त्या सर्वांचा ती हंसून स्वीकार करत होती. बक्षिसा-नंतर गर्दींत माधवी परत निघाली होती,–तिला आपला पदर कुणीतरी खेचल्याप्रमाणें वाटलें. तिनें मागें वळून पाहिलें, तों डोरोथी !

" माफ करा हं ! " ती पुढें होऊन हंसत म्हणाली " पण तुम्ही मिस् माधवी जोशी कां ? "

" हो ! " माधवीच्या चेहऱ्यावर आश्चर्य झळकलें.

" मी विद्याधरच्या पाकिटांत तुमचा फोटो पाहिला होता. आणि तुम्हांलाही मागें पाहिलें होतें पण ओळख नव्हती ! मला तुमची एका गोष्टीबद्दल माफी मागायची आहे ! "

" काय ? " माधवीला तिच्या लाघवी बोलण्याचें कौतुक वाटलें.

" विद्यानं मला एक पत्र दिलं होतं तुम्हांला पोस्ट करण्या-साठीं ! आणि माझा हलगर्जीपणा असा कीं मी अद्याप पोस्ट करते आहे ! "

" काय म्हणतां ? " माधवीला आतां आश्चर्य वाटूं लागलें.

" होय ! आणि त्याबद्दल मी फार दिलगीर आहे ! विद्याधर त्रिन्याला गेला आणि नंतर पुण्याला गेला. त्याचं काम फार पडलं होतं, शिवाय आणखी कांहीं कन्स्ट्रक्शनचीं नवीन कामं आलीं.

पपांनीं त्याला तार करून बोलावलं व तेव्हांपासून तो सारखा हिंडतो आहे !"

"असं !"

"दरम्यान तो एक दिवस इथं आला होता, मी आणि तो मिळून तुमच्याकडें आलों होतों, पण तुम्ही फिरायला गेला होता. विद्याधरची फार निराशा झाली. आणि त्याला ठीक करण्यासाठीं मला त्या दिवशीं सिनेमाचा भुर्दंड भरावा लागला ?"

"काय म्हणतां ?"

पाण्यावरील शेवाळ एकदम दूर व्हावें त्याप्रमाणें माधवीला मागच्या गोष्टी एकदम स्पष्ट दिसूं लागल्या व तिला फार आश्चर्य वाटलें.

"मग सांगतें काय ?" डोरोथी पुढें म्हणत होती "माझ्या मुळें फारच घोटाळा झाला आहे. त्या दिवशीं रात्रीं मी तुमच्याकडे आलें होतें, मला बंगला नीट ध्यानांत नाहीं, अन् पोस्ट-पाकिटावर विद्याधरनें जो पत्ता घालून ठेवला आहे तो फक्त पोस्टमनलाच सांपडेल ! तेव्हां तुमचा पत्ता सांगा, अन् विद्याधरला सांगूं नका अं, मी तुमचं पत्र आत्ता दिलं म्हणून !"

माधवी हंसली. तिच्या मनांत आलें 'किती निष्कपट, गोड अन् सरळ पोर आहे !'

तिनें अत्यंत प्रेमळपणानें तिचा निरोप घेतला व त्या दिवशीं माधवी घरीं गेली ती वाऱ्यावर तरंगतच !

## १३ : : डोरोथी

दुसऱ्या दिवशीं डोरोथी आली व ती आल्यावर माधवीचें व तिचें जें बोलणें झालें त्यावरून माधवीला कळून आलें कीं आपण विनाकारणच ह्या पोरीबद्दल वाईट कल्पना करून घेतल्या होत्या. ती फार मोकळी आणि प्रेमळ होती व माधवीसारखी एक सुविद्य मैत्रीण आपणांला मिळाली याचा तिला आनंद वाटत होता. " मी विद्याधरला किती वेळ सांगत होतें, कीं माझी एका तरी हिंदी पोरीशी ओळख करून दे ! पण तो कसला मुलुखाचा बुजरा ! " ती आल्यापासून सारखी बोलतच होती.

" खरंच, विद्याधर जरा कमी बोलके आहेत नाहीं ! "

" सुरवातीला ! आमच्या पपांच्या हाताखालीं तो काम करतो, सतरा वेळां आमच्या घरीं यायचा, पण पहिले सहा महिनें स्वारी नुसत्या ' वुईश ' पुढें कांहीं गेली नाहीं. शेवटीं मीच त्याच्याशीं बोलायला सुरवात केली ! हिंदी माणसांत मिसळणें मला फार आवडतं ! "

डोरोथीचा हा दुसरा उद्गार होता व तो ऐकून माधवीला आश्चर्य वाटलें व तिनें तिच्याकडें पाहिलें.

" तुमची मैत्रीची पद्धत व विचारसरणी उच्च असते ! तुमचा आदरशील आतिथ्यपणा पाहून तर मला मौजच वाटते ! तुमची नेस-

ण्याची पद्धत आणि घर सजविण्याची पद्धतही मला आकर्षक वाटते ! मी पुण्याला एकदा विद्याधरच्या घरीं गेलें होतें—

" तुम्ही विद्याधरच्या घरीं गेला होता ? " माधवीनें आश्चर्यानें विचारलें.

" हो ! त्यांची आई मला फार आवडली ! तिनें स्वैंपाक घरांत नेऊन मला पोहे अन् शिरा खायला दिला,—हो खरंच, मला आज तुमच्याकडून पोहे अन् शिरा पाहिजे ! मला ते जिन्नस फार आवडले ! मी विद्याला त्याची कृति विचारली, पण तो कसला मठ्ठ ! आमचे पपा कौतुकानें सांगतात, विद्याधर ट्रॉलीवरून जात असतो ते प्रत्येक पॉईंटवर हातोडी ठोकून जात असतो, तो उतरला आणि तिथच्या रूळाच्या बोल्टसमध्यें कांहीं फरक सांपडला नाहीं असं कधीं व्हायचं नाहीं ! पण ते त्याच्या नोकरीच्या कामांत झालें ! बाकी गोष्टींत मी त्याच्या तोंडावर सांगितलं कीं तूं मठ्ठ आहेस, अन् त्यानं तें कबूल केलं ! "

ती एका विषयावरून दुसऱ्यावर व दुसऱ्यावरून तिसऱ्यावर अशा कोलांटया मारत होती, व अशी भरमसाट बोलत होती कीं माधवीला शेवटीं तिचें फार कौतुक वाटूं लागलें. पण तिच्या या साऱ्या बोलण्यांतून एकच गोष्ट प्रतीत होत होती व ती म्हणजे तिचा मोकळा आणि लाघवी स्वभाव ! माधवीची व तिची अगदीं थोडया वेळांत चांगली मैत्री जमली.

" विद्याला मी लाख वेळां सांगितलं ! " ती म्हणत होती " कीं तुझ्या बहिणीला चार दिवस तरी लोणावळ्याला आण, पण तो कसला वस्ताद—"

" म्हणजे नंदिनी ! " माधवीनें विचारलें.

" येस् ! " ती एकदम ओरडली. तिच्या स्वरांत एकदम आर्द्रता आली व थोडेसे डोळे पाणावून ती म्हणाली

" मला ती पोर फार आवडली, मला अशी एकादी बहीण असती तर मी तिच्यावरून जीव कुरबान करून टाकला असता ! "

बोलतां बोलतां ती एकदम थांबली. माधवीनें तिच्याकडें पाहिलें व तिच्या मनांत एकच विचार आला

" काय या पोरीचा स्वभाव आहे! "

तिनें तिला स्वैंपाकघरांत नेलें. आपल्या आईची ओळख करून दिली. तिला पाहतांच मात्र यशोदाबाई म्हणाल्या

" होय ग ! त्या रात्रीं ही आली होती तुझ्याकडें ! पण मी विसरलें ! "

' ही पत्रं तशीच ठेवण्यानें आणि त्या विसरण्यानें—पण, माझ्या आणि विद्याधरमधें केवढे गैरसमज निर्माण झाले आई ! '—यशोदाबाईकडें पहात माधवी स्वतःशीं पुटपुटली व ती आणखी आपुलकीनें डोरोथीकडें बघूं लागली.

ती इतक्या मनमोकळेपणानें बोलत होती कीं यशोदाबाईंनाही आश्चर्य वाटत होतें. पोह्याची आणि शिऱ्याची बशी पुढें आली तेव्हां तिची मोठीच तारांबळ उडाली. तिला खाण्याची तर घाई झाली होती, पण पाटावर बसून चमच्यानें तें भराभर खाणें तिला जमेना. तिची तारांबळ उडूं लागली व माधवीला हंसूं येऊं लागलें.

तिनें माधवीचीं चित्रें पाहिलीं व आपलें आल्बम पहातांना ती किती रंगून गेली होती तें पाहून माधवीला अद्यापही आश्चर्य वाटत होतें. पियानो पाहिला तशी ती वेगानें धांवत गेली व भराभरा हात मारून तिनें तिथें मोठा कल्लोळ करून सोडला. त्यानंतर पंधरा मिनिटें तिनें अत्यंत सुश्राव्य वादन केलें व त्या कलेंतलीहि तिची प्रगति पाहून माधवीला समाधान वाटलें.

" तुम्ही म्हणता ना गाणं एकादं ! मला तुमचीं गाणीं फार आवडतात ! "

थोडया वेळानें ती म्हणाली, माधवीनें थोडे ओढेवेढे घेतले. पण डोरोथीनें तिचें म्हणणें ऐकलें नाहीं. माधवीला पियानोवर बसावें लागलें व ती गाऊं लागली.

तूं माझी अन् तुझाच मी खातर ना जोवरी
प्रीतीची हूल फुकट तोवरी
गालाला पडतें खळी मला पाहुनि
ही नजर पाहते तिरवी न्याहाळुनि
भयभीत थरकतें प्रीत नील लोचनीं
ओठांची थरथरत पाकळी, बोल गडे झडकरी
प्रीतीची हूल फुकट ना तरीं.

माधवीच्या हातांत कंप आला होता, नेत्रांत चंचलता आली होती. तिच्या नजरेसमोर विद्याधर उभा होता व कपोलाचे सीमाप्रांत लाल होऊन ती खालीं पहात होती.

डोरोथी थोडया वेळानें निघाली. जातांना ब्लाऊझच्या आंत हात घालून तिनें विद्याधरचें पत्र तिला काढून दिलें तेव्हां माधवीला आणखी आश्चर्य वाटलें. हेंच पत्र तिनें अशा जागीं कां ठेवावें याचा तिला उमज पडला नाहीं, पण ती विचार करण्याच्या मन:स्थितींत नव्हती. तिच्या हातांत विद्याधरचें एक हरवलेलें पत्र होतें. व तें आपण केव्हां वाचूं असें तिला झालें होतें, व डोरोथीनें मोटार सायकल चालू करतांच ती पुरती बंगल्याच्या बाहेर पडायच्या आंतच ती धावत धावत आपल्या खोलींत आली व प्रथम तिनें दाराला कडी घातली.

संध्याकाळीं भैय्यासाहेब घरीं आले व त्यांनीं तिला बोलावलें. माधवीला कल्पना होतीच व ती त्या तयारींतच होती.

" माई, आज तीन वार झाले. "

" कां, शशांकनीं कांहीं विचारलें ? "

" नाहीं, पण आतां आपणांकडून तयारी पाहिजे ! मग काय मी त्यांना ' होय ' म्हणून सांगूं ना ? "

" भैय्यासाहेब, " माधवी थोडीशी थांबली व ती थांबून थांबून बोलूं लागली " माझें मन तुमच्याविरुद्ध आहे. माझें पहिलें मत कायम आहे ! "

तें ऐकून भैय्यासाहेब गप बसले व थोडया वेळानें त्यांनीं विचारलें

" मग मी तुझें हें मत कायम समजूं ना ? "

" हो ! " आवंढा गिळीत माधवीनें उत्तर दिलें.

भैय्यासाहेब उठले व चालूं लागले.

" दादा, माझा राग आला ? " माधवीनें त्यांच्या मागोमाग विचारलें.

" छे ! " ते वळून पहात म्हणाले " तुझा राग आणि कशासाठीं ! "

" भैय्यासाहेब तुम्हीच म्हणत असाल तर—"

" छे ! छे ! पोरी, असं कसं ? " ते मागे आले व माधवीच्या अगदीं जवळ उभें रहात म्हणाले, " तूं माझी निराशा केली हें कबूल आहे, पण माई, तुझ्या शहाणपणावर माझा विश्वास आहे हेंहि तितकेंच खरं ! "

" भैय्यासाहेब ! भैय्यासाहेब ! "

माधवी वळून त्यांच्याकडे पहात म्हणाली. तिच्या डोळ्यांतून अश्रुबिंदू ठिपकले, व ते भैय्यासाहेबांच्या पायावर !

दारावरची घंटी सारखी वाजत राहिली व माधवी आंतून वेगा-वेगानें धावत आली. तिची वृत्ति आज फार उल्हासित होती व त्या भरांत तिनें आपल्या पुढयांत असलेला पोर्ट्रेट आज संपवत आणला होता. तिचें काम ऐन रंगांत आलें होतें व अशा वेळेला दारावरील घंटी एकदम वाजूं लागली. यशोदाबाई झोपल्या होत्या, भैय्यासाहेब नुकतेंच फर्ममध्यें गेले होते. गडीमाणसें मागच्या बाजूला काम करीत होतीं. आणि अशा वेळेला घंटी वाजवणारा हा महाभाग कोण असावा याची तिला कल्पना येईना. तिनें ब्रश बुडवला व पुन्हां चालवला, पण घंटी तिकडे सारखी चालूं राहिली. तिनें तें काम तसेंच ठेवलें व ती बाहेर गेली.

पण जितक्या रोषानें ती बाहेर गेली होती, तो तिचा सारा रोष तिनें दारावरचा पडदा सरकावून बाहेर प्रवेश केल्यानंतर नाहींसा झाला. तो विद्याधर होता व त्यानें घंटीवरचें बोट अजूनही तसेंच कायम ठेवलें होतें. खाकी हाफ पॅन्ट, निळसर मोजे, भालप्रदेशावरून घर्मबिंदू अद्याप निथळत होते व त्या वेशावरून तो कामावरून सरळ तिच्याकडेंच आलेला दिसत होता.

विद्याधर दिसतांच तिचा सारा रोष नाहींसा झाला व कपोला-वरून एकदम हास्याच्या कळ्या उमलल्या.

"किती उतावीळपणा!" विद्याधरच्या मिष्कील हास्याकडे पाहात ती उद्गारली.

"तें तुला कळायचं नाहीं!" विद्याधर आंत येत म्हणाला.

"त्याला पुरुषाचा जन्म पाहिजे!"

"तर—तर!" माधवी लटका राग दाखवत म्हणाली.

"काल तुझं पत्र मिळालं! उंबराचं फुलंच! मी आमच्या इंजिनिअरला विचारलं अन् लगेच निघालों!"

"डोरोथी भेटली?"

"छे! पहिल्यांदा तुझ्याकडेंच आलों!"

"खरं!"

माधवीनें त्याच्याकडे पाहिलें व तिच्या चेहऱ्यावर पुन्हा आनंद फुटला.

विद्याधर आला, तिच्या खोलींत बसला, तिच्या चित्रांत त्यानें दोनचार सुधारणा सुचवल्या व नंतर टेबल फॅन जोरांत चालू करून तो तिच्याकडे पहात राहिला.

"सरबत?"

"होय! आणि तें तूं करून आण!"

माधवीला त्याच्या या अधिकारवाणीनें फार आनंद वाटला व ती हर्षातिशयानें आंत गेली.

"कालच दादा तुमची आठवण काढत होते!" परत आल्यावर त्याच्या पुढयांत बशा सरकावत माधवी उद्गारली.

"कां? पुस्तक तयार झालें?"

" होय ! चार दोन दिवसांत हातीं येईल ! मुख पृष्ठावरचं चित्र फारच सुंदर आहे, आंतलीं चित्रें आणि छपाईही सुंदर आहे ! मी कच्चा खर्डा पाहिला ! "

" आभार ! "

" इश्श्य ऽ ! यांत आभार कसले " माधवी लाजत म्हणाली.

" बरं मुक्काम ? "

" चार दिवसांची सवड आहे, आणि मधु, विचार असा आहे कीं हा सारा वेळ शक्य तो तुझ्याच संगतींत काढायचा ! "

" होय ? " माधवी खालीं पहात म्हणाली.

संध्याकाळीं ते डोरोथीकडे गेले व तिथें त्यांना समजलें कीं डोरोथी सकाळींच लोणावळ्याला निघून गेली. विद्याधरनें तो निरोप ऐकला व माधवीकडें पाहिलें, त्याच्या मनांत काय होतें तें तिनें बरोबर ओळखलें व तिच्या चेहऱ्यावर स्मिताची सूक्ष्म रेषा उमटून गेली.

वारा वहात होता व विद्याधर वेगांत ड्रायव्हिंग करत होता. त्याचे केस फडफडत होते व माधवीच्या भाल प्रदेशाच्या रोखानें त्यांची धाव होती. त्याची मुद्रा शांत होती व स्टिअरींग व्हीलवर तो इतक्या स्वस्थपणें हात ठेवून होता कीं समोरच्या सागराचा संथपणाच माधवीच्या नजरेंत भरला. मधून मधून तो तिच्याकडें पाहीं व त्यावेळीं त्याच्या दृष्टींतील भाव न्याहाळून पहातांना तिला मोठी मजा वाटे. समुद्रावरचा खारा वारा झोंबे व डामरी सडकेवरून मोटर वेगानें धावतांना हिंव थडथडल्याप्रमाणें वाटे. समोरच्या कोनांत एक बारीक तिरपा आरसा टांगलेला होता व त्याच्यांतून विद्याधर माधवीच्या

निरागस चेहऱ्याकडे पहात होता. एकाद्या अल्लड आणि निष्पाप बालिकेप्रमाणें ती त्याच्या शेजारी बसली होती व तिच्या एकंदर भावमधुरतेकडे व देहसौष्ठवाकडे पहात विद्याधर म्हणत होता,

" या सुंदर पोरीच्या सहवासांत आतां आपण चार दिवस काढायचे हं ! "

दुसरें दिवशीं विद्याधर तिला कोरोनेशन पूलवर घेऊन गेला. माधवीला पोहतां येत होतें, पण तरीही इतक्या मोठया पाण्यांत तिनें प्रवेश केला नव्हता. विद्याधरनें तिला मारून मुटकून तयार केली पण पूलवर येतांच ती पुन्हा घाबरली. ड्रेसिंग रूममधें ती गेली पण तो ड्रेस चढवल्यावर विद्याधरसमोर तिला बाहेर येण्याचें धैर्यच होईना.

" मला आश्चर्य वाटतं मधु, " विद्याधर तिच्याकडे पाहून म्हणत होता, " तूं सुशिक्षित तरुणी, व त्यांतून चित्रकलेंत अभिज्ञ आणि असें असतां तुला ह्यांत संकोच वाटण्याचें काय कारण आहे ? चल ! "

असें म्हणून विद्याधरनें तिचा हात धरला व तिला घेऊन गेला. बाहेरील देखावा मोठा मजेचा होता. प्रशांत आणि विस्तृत असा तो डोह समोर पसरलेला होता व त्यांत विलास करणाऱ्या तरुण तरुणींची अवस्था एकाद्या विरहोत्सुक चक्रवाकाप्रमाणें होती. पाण्यावर पूर्वीप्रमाणें प्रकाशाचे झोत मधून मधून टाकण्यांत येत होते व आंतील हालचालीमुळें तें सारखें फेसाळून राहिलें.

विद्याधर झरझर पायऱ्या उतरून पुढें गेला व हात पुढें करून त्यानें अळगद पाण्यांत शरीर झोकून दिलें. थोडया वेळानें तो वर आला. त्याच्या केशभागांतून पाणी निथळत होतें व पाण्यावर होणाऱ्या त्याच्या गौर आणि भरदार शरीराची हालचाल पाहण्यासारखी होती.

" किती बांधेसूद शरीर आहे याचं ! "

माधवी मनाशी पुटपुटली, व त्याच वेळीं विद्याधरचें लक्ष्य तिच्याकडें गेलें.

" अजून कां उभी ? " हात मारीत जवळ येत त्यानें विचारलें.

माधवी गोंधळली व थोडया वेळानें पुटपुटली.

" मला भिती वाटते ! "

" पण माझ्यावर विश्वास आहे ना ? चल ! "

असें म्हणून त्यानें तिचा हात ओढला व ती अलगद पाण्यांत शिरली. गार पाण्याचा स्पर्श होतांच तिचें शरीर शहारलें व पहिले एक दोन क्षण ती भांबावल्याप्रमाणें झाली, पण थोडक्याच काळांत तिचा आत्मविश्वास परत आला व तिला धीर आला. विद्याधर तिच्या-बरोबर रहात होता, पण नंतरची तिची प्रगति पाहून तो स्वतंत्र पोहूं लागला.

पुलाच्या मध्यभागीं अर्ध्या अर्ध्या फुटाचे पट्टे उभे केले होते व त्याच्या लांबीवर अंतराअंतरानें कारंजीं ठेवलीं होतीं. कारंजाचे तुषार उडत, ते उन्हांत चमकत व त्याचा मंद मंद झोत अंगावर घेण्यास फार मजा वाटे.

अशा एका कारंजापाशीं विद्याधर बसला होता व मधु त्याच्या-पाशीं जाऊन उभी राहिली. तिचें अर्धशरीर पाण्यांत होतें व दोन्ही हातांनीं साखळी धरून ती पट्ट्याच्या टोकाला पाय लावून पाण्याशी समांतर होण्याचा प्रयत्न करी. कारंजाचे तुषार चमकत व त्याच्या आड माधवीला निरखण्यांत विद्याधरला मोठा आल्हाद वाटे. तिची

भिती आणि संकोच पूर्ण नाहींसा झाला होता व मोठया मनमोकळे-पणानें ती हंसत होती. तिनें अंगांत पांढरा स्विमींग सूट घातला होता. व तिच्या निमगौर वर्णाला तो फारच खुलून दिसत होता. पाण्याचे तुषार तिच्या शरीराच्या निरनिराळ्या भागावरून ते निथळून जातांना पहाण्यांत विद्याधरला फार आकर्षण वाटें.

" काय पहाता ?" तो सारखा आपल्याकडे निरखून पहात आहे हें पाहून माधवीला थोडें गोंधळल्याप्रमाणें झालें व तिनें विचारलें.

" तुलाच पाहतो आहे ! " विद्याधर अधिक तिच्याकडे रोखून पहात म्हणाला " बाकी हे चार दिवस फार मजेत गेले नाहीं ? "

" हो ! म्हणजे उद्यां तुम्ही जाणार ?" माधवीनें थोडया व्याकुळतेनें विचारलें

" मी तर रात्रींच जावं म्हणतो !"

" हो ! तें साहजिकच आहे म्हणा !"

" कां ?" विद्याधरला तिच्या बोलण्याचं आश्चर्य वाटून त्यानें विचारलें.

" तेवढी घाई असणारच ! "

" तुला डोरोथीबद्दल बोलायचं आहे कां ?" विद्याधर एकदम तिचे हात हातांत घेऊन म्हणाला " मधु, तुझी किती ही चुकीची कल्पना ? डोरोथीबरोबर मी हंसतो बोलतो चालतो, पण तूं म्हणतेस त्या अर्थाची माझी भावना कधींच नव्हती ! "

माधवीच्या चेहऱ्यावर गुलाब उमलत होते. तिच्या नाकपुडया रुंदावल्या होत्या, पण तरी पण संयम राखून ती म्हणाली,

" तुमच्या मनांत नसेल, पण तिच्या मनांत काय आहे याची तुम्ही विचारपूस केली आहे कां ? तसं असेल तर तिचाच तुमच्यावर जास्त हक्क नाहीं कां ?"

" आतां तुला कसं सांगू मधु, " विद्याधर तिच्या नजरेला नजर देत संथपणें म्हणाला " माझ्या माहितीप्रमाणें ती पॉवेल नांवाच्या त्यांच्या नात्यांतल्याच एका तरुणाशी वचनबद्ध आहे. तरी पण तुम्ही बायका भारी मत्सरी बुवा, मी लोणावळ्याला गेल्यावर तिला विचारून कळवतो. पण मधु, तूं शशांकला कां नकार दिलास ? तो रिझर्व्ह बँकेचा आज असिस्टंट—

यावर माधवीचा चेहरा गोरामोरा झाला व तो त्याच्याकडे पहात म्हणाली

" विद्याधर, तुम्हांला असं मला विचारावतं ना ?"

" मधु, पण तुझ्याशी तुलना करतां मी फारच गरीब—"

पण माधवीनें त्याला पुढचे शब्दच बोलूं दिले नाहींत. त्याच्या हाताला धरून तिनें ओढलं व लाटेच्या प्रवाहांत त्याचे शब्द त्याच्या तोंडांतच गडप झाले.

---

## १५ पुनश्च शशांक

विद्याधरला पोचवून माधवी घरीं आली. तिला परत येतांनाच फार बेचैन वाटत होतें व आपला वेळ कसा जाईल याची तिला पंचाईत पडली होती, पण ती घरीं येते न येते तोंच तिच्या फाटकांतून दुसरी मोटर आंत शिरली. ती आश्चर्यानें पहातें तों तिची मैत्रीण माया, व तिच्याच पाठोपाठ तिच्याच रंगाचा पण व्यवस्थित पोशाक केलेला एक तरुण उतरत होता.

" हे पराग देशपांडे !"

माधवीनें त्यांना नमस्कार केला.

" माझे भावी यजमान !"

" म्हणजे ?" माधवीचे पुढचे शब्द तिच्या तोंडांतच राहिले व कोचांत स्वतःला मुडपीत ती आश्चर्यानें मायाकडे पहात राहिली.

" परवा दिवशी आमचा विवाह आहे ! ब्राह्मण समाजांत वैदिक पद्धतीनें ! ही आमंत्रण पत्रिका आणि उद्यां सकाळपासून तूं माझ्या घरीं पाहिजेस ! कॉलेजांत माझी बहीण होतीस ना ? पराग, तुम्ही हिला कांहीं सांगा !"

" होय, होय, मिस् माधवी ! तुमच्याबद्दल हिंनं मला खूप सांगितलं आहे आणि म्हणून मी म्हणतों—

" अहो पण एवढया आग्रहाची काय जरूर ? मी येईन हं माया !"

" हं ! सकाळींच मी कार पाठवून देतें !"

तीं दोघेंजन निघून गेलीं तरी माधवी त्यांच्याकडें पहात होती. ती मनाशीं म्हणत होती, काय जग सुधारते आहे ?"—पण त्या निमित्तानें तिचे ते दोन तीन दिवस फार मजेंत गेले. तिच्या साऱ्या समवयस्क मैत्रिणी व कॉलेजांतल्याही कित्येक सहाध्यायिनी त्या निमित्तानें तिथें जमल्या होत्या व त्यांचा हास्यविनोद व मायाची चेष्टा ह्या नादांत माधवीला खरोखर वेळेची कल्पना येईना. माया ही फार निस्पृह व संकोच न बाळगणारी विद्यार्थिनी समजली जात होती, पण त्या पोरींनीं तिचीही इतकी टर उडवली कीं शेवटीं तीही लाजूं लागली. माधवीला मोठी मौज वाटली व तरुण मनाची स्थिती पाहून तिला मोठें नवल वाटलें.

जमलेल्या मंडळींत तिला शशांकही दिसला. त्यानें तिला पाहिलें पण ओळख देण्याचा त्यानें कांहींहीं प्रयत्न केला नाहीं. तिला पुन्हा नवल वाटलें. काय माणसाच्या एकेक तऱ्हा असतात पण थोडया वेळानें तिला कळून आलें कीं तो शुद्धिवर नाहीं. तो पीत असावा अशी शंका तिला यापूर्वींच आली होती पण आत्ताचें स्वरूप अगदीं स्पष्ट होतें. तें पाहून तिला वाईट वाटलें.

ती घरीं आली तसें लोणावळ्याचा पोस्टाचा शिक्का असलेलें निळें पाकिट तिच्या टेबलावर तिला दिसलें. तिनें थोडयाशा अधीरतेनें तें फोडलें. आंत विद्याधरचें एक छोटेसेंच पत्र होतें, पण डोरोथीचें

मात्र एक लांबलचक पान होतें. तिचें पत्र फार मजेशीर होतें व तें वाचतांना माधवीला फार आल्हाद वाटत होता.

—" तुला वाटलं मी विद्याधरला तुझ्यापासून पळवून नेईन !– पण तसें झालें असतें तर खरोखरच मला बरें वाटलें असतें ! मधु, तुला खरं सांगु, मी विद्याधरवर अनुरक्त आहे. त्याला मी प्रथमपासून पाहिलें तेव्हांच त्याच्या असामान्य व्यक्तित्वाची माझ्यावर छाप पडली, व म्हणून तो लाजत होता, तरी मी त्याच्याशी बोलणें सुरू केलें. मी त्याच्या प्रेमाचा विषय व्हावा यासाठींच माझी ही सारी धडपड होती पण त्याचा व माझा सहवास जसजसा वाढूं लागला व त्याच्या वाद-विवादांतून त्याच्या बुद्धिमतेची चमक जसजशी माझ्या निदर्शनाला येऊं लागली तसतसें मला कळून चुकलें कीं स्त्रीबद्दलच्या त्याच्या अपेक्षा मी सर्वांशानें पुऱ्या करूं शकत नाहीं व त्याच वेळेस मी ठरवलें कीं मी त्यांच्या बहिणीप्रमाणें प्रेम करायचें ! माझा तो निश्चय अद्याप कायम आहे व त्याप्रमाणें मी माझ्या पॅव्हेलशीं वचनबद्धही पण झालें आहे.

आतां तरी तुला शंका येणार नाहीं ना ? विद्याच्या राणी, तुझ्या भाग्याचा खरोखरी मत्सर वाटतो. पण इतकें सारें स्पष्टपणानें लिहूनही मी सांगतें कीं तुझ्यासारखी विद्याला अनुरूप अशी सहचारिणी मिळते आहे हें पाहून माझा ऊर भरून येत आहे. तूं आता पुन्हा मला भेटशील तेव्हां मी तुझे असे गालगुच्चे काढणार आहे, कीं –"

माधवी पत्र वाचतांच इतकी मग्न झाली होती कीं दालनांत भैय्यासाहेब आले आहेत व ते मोठमोठ्यानें बोलताहेत याचा तिला

पत्ताच नव्हता. डोरोथीचें पत्र तिनें खालीं ठेवलं व तिला यशोदा-बाईंचा आवाज ऐकूं आला.

" मग ताईच शहाणी म्हणायची ? "

" हो नाहीं तर काय ? मी त्यांच्याबद्दल थोडं फार ऐकून होतों पण आज माझी खात्रीच पटली ! "

" काय झालं दादा ? " माधवी खालीं येऊन विचारीत होती.

" ये, बेटा ! "

भैय्यासाहेबांनीं तिला सांगितली ती हकिकत अशी—

" कामानें मन त्रासलें होतें म्हणून मी संध्याकाळीं बिलिअर्ड क्लबमध्यें गेलों. तिथें शशांक बसलेले होते. स्वारीचे डोळे लाल झालेले होते, नजरेंत विचित्र चमक होती. बँकेंतही त्यांच्या हातून आतांशा फार चुका होत असतात. हें सारें मी ऐकून होतों. मी जवळ जाऊन त्याला ' वुईश ' केलें तर तें परत करण्याचीही त्याची तयारी नव्हती. स्वारी आधींच झिंगलेली पण मला पाहिल्यावर त्याला जोर चढला. आमच्या क्लबमध्यें ड्रिंक्सची सोय आहे, पण त्याच्याकरितां निराळा बार आहे. ओपन हॉलमध्यें बसून कुणी घेत नाहीं. पण शशांकनें हॉलमध्यें बाटल्या मागवल्या व पेग मागून असे पेग चढवले कीं मधु, मी खरोखरच थक्क झालों. स्वारी त्या लाइनींत चांगलीच सरावलेली दिसली मला !—बरं, नंतर तरी गप बसूं नये ? मी बाहेर निघालों तर आपण बाहेर निघाले. मोटर भरधांव घातली माझ्यापुढें ! काय मोटर चालवत होता तो गृहस्थ ! "

" कां ? ॲक्सिडेंट वगैरे केला काय ? "

"तर काय ? मोटर क्षणांत ह्या साओीडला, तर क्षणांत त्या साईडला! आणि पुन्हा भरवेगांत! चढली एका फूटपाथवर न मग काय ? समोरच्या दुकानच्या शोकेसच्या कांचा फोडल्या अन् नंतर स्वारी शुद्धिवर आली! पोलीस आला–पंचनामाच व्हायचा, पण ह्यांचं नांव ऐकल्यावर पोलीस नरम पडला व दुकानदारही थंड झाला. पण सगळ्यांत जास्त मला चीड आली ते, शिष्टाचार म्हणून मी नंतर मोटर थांबवून त्यांच्याजवळ गेलों तर राजेश्री माझ्याकडे बोट दाखवून म्हणतात काय 'ह्यांची गाडी मागून जोरांत येत होती व म्हणून मला माझी स्पीड वाढवावी लागली—"

---

विद्याधरच्या पुस्तकांची दुसरी आवृत्ति प्रसिद्ध झाली व सुमारे महिनाभरांतच त्याच्या सर्व कॉपीज संपून गेल्या होत्या. दिनकररावांना तें पुस्तक फारच फायद्यांत पडलें होतें व सगळ्यांत त्यांना जास्त आश्चर्य वाटलं तें हें कीं त्याला परदेशांतूनही मागणी येत होती. त्यांनीं पूर्वीपेक्षांही सुबक व अधिक चांगला कागद व मुद्रण व चित्रें देण्याचें ठरवलें होतें. दुसऱ्या आवृत्तिपेक्षां तीनशे रुपये त्यांनीं विद्याधरला जास्त देण्याचें ठरवलें होतें व त्या धामधुमींत ते होते इतक्यांत विद्याधरचें त्यांना एक पत्र आलें व ते स्तंभितच झाले. पत्र छोटेंच होतें व त्यांतील मजकूर असा होता:—

" या आवृत्तींत मला एक अर्पणपत्रिका घालायची आहे व ती पुढीलप्रमाणें

माझी प्रीतिदेवता

माधवी ईस—"

भैय्यासाहेबांनीं तें पत्र वाचलें व ते टेलिफोनच्या नळीपाशी गेले. यशोदाबाई दिवाणखान्यांत होत्या व त्यांनीं फोन घेतला.

" हॅलो, कोण—"

" मी ! "

" मी म्हणजे ? "

" म्हणजे काय ? इतकीं कां माणसें ओळखू येईनाशी झालीं ? कमाल आहे बाई ! "

" हं ! हं ! तूं आहेस होय ? " दिनकरराव समजून म्हणाले " हे पहा, माई आहे कां ? "

" हो ! रेडिओ ऐकत पडलीय ! बोलावूं ! "

" नको–नको ! हें पहा, तुम्हीच सांगा तिला कीं ' तिला पाहण्यासाठीं इथें एक गृहस्थ तिष्ठत बसले आहेत, लौकर ये म्हणावं ! "

" म्हणजे ? तिला मी पाठवूं म्हणता ? "

" होय, होय ! त्या गृहस्थांना बिलकूल वेळ नाहीं व ते कांहीं धंद्याच्या कामासाठीं मला भेटायला आले आहेत तेव्हां तुम्ही तिलाच इकडे पाठवून द्या ! "

" बरं ! " आपला निरुत्साह आपल्या स्वरांत आणत यशोदाबाई उत्तरल्या.

" आणि हें पहा ! जरा–नीट पाठवा हं ! "

" हं समजलं ! "

थोडयाच वेळांत त्यांच्या दुकानापुढें माधवीची मोटर उभी राहिली. तिनें दार उघडलें व असें फट्ट करून वाजवलें कीं पुढें आलेले सबनीस तिच्या तोंडाकडें पहातच राहिले.

" सबनीस ! " माधवी आंत आली व आंत भय्यासाहेबांच्या जागेकडे व इतरत्र पहात तिनें विचारलें.

" सबनीस ! "

तिनें दोन तीन वेळां फक्त एवढाच उद्गार काढला व नंतर आजुबाजूलाच पहात आहे हें पाहून तेही आजुबाजूला पाहूं लागलें. गिऱ्हाईकांची थोडीफार गर्दी होती व प्रत्येक विभागांतला सेल्समन आपण व्यवस्थितपणें काम करीत आहोंत असें दाखवण्यांत गढून गेला होता. कोपऱ्यांतला टाईपरायटर वाजत होता व त्याच्या पुढयांत बसलेले दोन तीन कॉरस्पॉन्डन्स क्लार्क खालीं मान घालून लिहण्यांत मग्न झाले. माधवी फर्ममधें कधीं येत नसें व आलीच तर तिथलें वातावरण तिला कंटाळवाणें होत असे. तरी पण त्या नोकरवर्गांत ती फार प्रिय होती व त्यांच्यांत कित्येक नोकर असे होते कीं माधवीच्या लहानपणापासून ते तिला पहात होते.

माधवीच्या जन्मापासूनच ह्या फर्मचा फार उत्कर्ष झाला होता. व त्यामुळें त्या लोकांनाही माधवी म्हणजे एक फार कौतुक वाटे. त्यांच्यासमोरची जाईची हिरवी कळी आज पूर्ण उन्मीलित झाली होती व आज जरीचे ठिपके असलेला हिरवा जॉर्जेट नेसून ती त्यांच्या पुढयांत उभी होती. तें वस्त्र तिच्या शरीराला फारच खुलून दिसत होतें व प्रवेशद्वारापाशीच ती उभी असल्यामुळें तेथील निऑन-साईन्सच्या अक्षरांचा प्रकाश तिच्या तोंडावर पडून तिची कांति फारच शोभादायक दिसत होती.

"माई, आंत चलता ना?" माधवी तशीच शून्य दृष्टीनें समोर पहात उभी आहे हें पाहून सबनीस तिसऱ्यांदा उद्गारले.

"अं! काय म्हणतां?" अखेर भानावर येऊन माधवीनें विचारलें.

"आंत चलता ना? भैय्यासाहेत आंत आहेत! त्यांनीं मला केव्हांचं सांगून ठेवलं आहे कीं तुम्ही आल्याबरोबर आंत पाठवायचं!"

"आंत कोण आहे?"

"कोण मेक्सिकन कंपनीचा प्रतिनिधी आहे!"

माधवीच्या कपाळांवर आठयांचं जाळ पसरलं व ती पुढें कांहीं विचारणार तोंच आंतला दरवाजा उघडून भैय्यासाहेबच पुढें झाले.

"अरे, हे काय मधु? चल ना आंत! मी तुझी केव्हांपासून वाट पहातों आहे!"

माधवीनें निमूटपणें त्यांच्या मागून प्रवेश केला. ही भैय्या-साहेबांची खाजगी खोली होती व माधवीला ती फार आवडत होती. तिच्यांतही एक पार्टिशन पाडून त्यांनीं दोन भाग केले होते व आंतील मॅटिंग, रचना, कोचेस व पंखे वगैरे व्यवस्था इतकी उत्तम होती कीं आंत येणारा प्रत्येकजण खूष होत असे.

पण माधवीची तब्येत आज खूष नव्हती खास! आंत सुमारे पंचविशीचा गोरापान तरतरीत व एक उमदा तरुण बसला होता. माधवीला पहातांच तो उठून उभा राहिला.

"बसा, बसा तुम्ही! रमेशराव, ही माझी मुलगी माधवी!"

"Oh! Very glod to see you!" असें म्हणून त्यानें शेक हँडसाठीं हात पुढें केला.—पण माधवीनें नुसत्या नमस्कारावरच भागवलें.

"She stood in second class in Art Master's examination recently held in Bombay (या वर्षींच ती आर्ट-मास्टरच्या परीक्षेंत दुसऱ्या वर्गांत पास झाली!)"

" Oh ! she is Artist then ! (तर मग या कलाकार आहेत?)

" येस ! "

" ओ ऽ ! मग खरोखरच आपल्याला पाहून फार आनंद झाला ! "

भैयासाहेब एका निराळ्या पद्धतीनें बोलत होते व तो तरुण एका निराळ्या पद्धतीनें बोलत होता. माधवीला कांहीं केल्या तो गोंधळ समजेना—पण तो समजण्याच्या मनःस्थितींतही ती नव्हती. थोडया वेळानंतर भैय्यासाहेबांनीं पोऱ्याकरवीं उत्तम कॉफी व अत्यंत उंची उंची अशा केक्स मागवल्या व त्या खाण्याचा ते रमेशरावला इतका आग्रह करूं लागले व त्यांच्या स्वरांत इतकें लाघव होतें कीं माधवीलाही आश्चर्य वाटल्याखेरीज राहिलें नाहीं.

तिनें तो सारा कडू प्रसंग सहन केला; भैयासाहेबांनीं रमेशला निरोप दिला व नंतर ते माधवीला येऊन विचारूं लागले;

" काय मत आहे तुझं ? "

तेव्हां मात्र तिला वाटलें कीं आपल्याला रडूं कोसळणार ! तिनें मुकाटयानें तें दाबलें व भैय्यासाहेबांच्या तोंडाकडें पाहिलें.

कां ?" त्यांनीं पुन्हा विचारलें.

आतां मात्र तिला आवेग अनावर झाला व टेबलावर दोन्ही हात टेकवून तिनें मान त्यांच्यांत लपवली

" भैय्यासाहेब, " ती हळूं हळूं म्हणत होती "सर्व गोष्टी माहित असता तुम्ही असं विचारावं म्हणजे—"

असें म्हणून तिनें हुंदका दिला. भैय्यासाहेब पुढें झाले व हलकेच तिच्या पाठीवर हात ठेवून तिची मान वर करत ते म्हणाले

" तेंच मला तुझ्याकडून पाहिजे आहे, व त्याच्या करतांच मी तुला इथें बोलावलें आहे !"

" म्हणजे काय ?"

" म्हणजे काय ? मधु, मला सारं समजत नाहीं असं कां तुला वाटतं ? पण माझी अशी इच्छा कीं तूं तें आपल्या तोंडानें मला सांगावेंस ! हें पहा बर ! हेंच ना तें ?"

असें म्हणून त्यांनीं तिच्या पुढयांत विद्याधरचा लिफाफा टाकला व ते तिच्या चेहऱ्याकडे पाहूं लागले. माधवीनें तें पत्र वाचलें. तिचा चेहरा एकदम उचंबळून आला व हर्षोत्फुल्ल नजरेनें ती भैय्यासाहेबाकडें पाहूं लागली. भैय्यासाहेब तिच्या आणखी जवळ-आले व पुन्हा मृदु हस्तानें तिची पाठ थोपटत म्हणाले

" कबूल ! बरं बेटा–कबूल ! "

× × ×

माधवीनें ताबडतोब विद्याधरला पत्र पाठवलें व दुसऱ्या दिवशींच तो येऊन दाखल झाला. आणि विशेष हें कीं तो येताना पुण्याला जाऊन नंदिनीला घेऊन आला होता, तिला पाहून माधवीला फारच आनंद झाला होता, व त्याच्या दसपट मावशीनें पाठवलेला खण व मंगळसूत्राचे दोन मणि पाहून ती शरमली होती. तिनें फक्त दोनच ओळीचें पत्र पाठवलें होतें

"फारच वस्ताद आहेस हं तूं ! असूं दे ! मला फार आवडलं !"

नंदूनं तिला एकांतांत घेतलें होतें व हळूंच आपले ओठ तिच्या कानापाशी नेऊन तिनें आपल्या बोबडया बोलांत विचारलें होतें

" माई, आई म्हणत होती,–तूं माझी वहिनी होनाल ? खलं कां ग ?"

" हो !" माधवीनें तिच्या केसावरून हात फिरवित उत्तर दिलें, व नंतर पुन्हा हलकेच तिच्या कानाजवळ जाऊन विचारलें

" पण तुला हें आवडेल ना ?"

नंदिनीनें यावर कांहींच उत्तर दिल नाहीं. तिनें तिच्या गळ्यांत हात टाकले व तिच्या वक्षावर आपलें मस्तक टेकवून ती तिच्याकडें पहात राहिली.

माधवीचें वात्सल्य उंचबळून आलें व तिनें तिच्या ओठांवर आपले ओठ टेकवले. त्या चिमण्या ओठांचा स्पर्श तिला किती उन्मादकारी वाटला व त्या संभ्रमांत ती आहे तोंच तिच्या मानेवर कुणाच्या तरी हाताचीं बोटं टेकवलीं गेलीं.

तिनें मान वळवून पाहिलें.

" इश्य् ऽ!" मान वेळावत ती उद्गारली.

तिच्या गालावर लाली चढली व कानाचीं पाळें लाल होऊन त्यांचा रक्तिमा अवर्णनीय झाला होता. नजर अधोमुख जात होती, व नेत्रांचें चांचल्य—

विद्याधरला राहवलें नाहीं व नंदिनी खोलीबाहेर गेलेली पहातांच त्यानें तिला हलकेंच बाहुपाशांत घेतली.

---

*

# नागपूर प्रकाशन,

सीताबर्डी, नागपूर



## प्रकाशित वाङ्मय

| | |
|---|---|
| १ माझें कादंबरी लेखन | १॥ |
| २ वीणा | ३ |
| ३ लढवय्ये | ३॥ |
| ४ शककर्ता शालिवाहन | २॥ |
| ५ परामर्श | ३ |
| ६ प्रमद्वरा | २॥ |
| ७ द्राविडी प्राणायाम | २। |
| ८ अमावास्या | २॥ |
| ९ कंगाल | २। |
| १० अंडलतट्टू | ३। |
| ११ प्रत्यय | २॥ |
| १२ पुन्हां एकदां | ३। |
| १३ माझी शाला | १। |
| १४ मृगाचा पाऊस | २ |
| १५ दोन घडीचा डाव | २॥ |
| १६ म्हणे लढाई संपली | १॥ |
| १७ लांब लांब सांवल्या | २ |
| १८ तेरी चूप मेरी चूप | २ |
| १९ दान प्रख्यात युद्धतंत्रें | २ |
| २० सन १८५७ चें स्वा. यु. | -॥- |
| २१ नवीं मूल्यें | ३। |
| २२ सखी | २॥। |
| २३ सावलीच्या उन्हांत | ३ |
| २४ जीवनप्रवाह | २॥ |
| २५ हंसदूत | २। |
| २६ मार्क्सवादी अभ्यासक्रम | १॥ |
| २७ तिसरें राज्य | ॥= |
| २८ इंदिरा | २॥। |
| २९ गोल देऊळ | ३ |
| ३० दूर कुठें तरी | २॥। |
| ३१ जगाला कळलें पाहिजे | २॥ |
| ३२ कालसमुद्रांतलि रत्नें | ४ |
| ३३ लकेरी | २॥ |
| ३४ मधु | २। |



